# विक्रिस तयार



| पुस्तकाचें नांव. | किंमत रु० | आ० | पै. |
|---|---|---|---|
| चंद्रप्रभाविरह वर्णन | २ | ० | ० |
| नवनारी चरित्र | ० | १२ | ० |
| जादूची कमला | ० | १२ | ० |
| गुलबकावली | ० | १२ | ० |
| अनुभविक औषधी चुटके | १ | ० | ० |
| व्यवहारमंजरी भाग १ ला | ० | १२ | ० |
| व्यवहारमंजरी भाग २ रा | ० | १२ | ० |
| चतुर लोकांच्या नकला | ० | ६ | ० |
| औषधी बटवा | ० | ६ | ० |
| संगीत सीतापरित्याग | ० | ६ | ० |
| गुरुकिल्लीच्या लावण्या भाग १ ला | ० | ४ | ० |
| ,, भाग २ रा | ० | ४ | ० |
| दोन भजनांचा सामना | ० | १२ | ० |
| ज्ञानेश्वरी ( गुटका ) | १ | ८ | ० |
| भागवत मूळ | १ | १२ | ० |
| सुशील यमुना | ० | १२ | ० |
| बाजीराव बल्लाळ यांचें चरित्र | ० | ८ | ० |
| गुरुचरित्र गुटका | १ | ८ | ० |
| गुरुचरित्र पोथी | १ | ८ | ० |
| दीपरत्नाकर | १ | ८ | ० |
| शारंगधर | २ | ८ | ० |

# हातिमताई चरित्र

अथवा

## हसनूबानूचे सात सवाल.



हें पुस्तक

रा॰ रा॰ कृष्णाजी नारायण शास्त्री

ह्यानें मूळपुस्तकाच्या आधारें

लिहिलें.

तें

मुंबई येथें "श्रीकल्पतरु" छा॰ छापिलें.



शके १८१६ सन १८९५



किंमत सव्वा रुपया.

# प्रस्तावना.



परोपकारासारखें पुण्य नाहीं व परपीडे सारखें पाप नाहीं, हीं वाक्यें सर्वस्थळीं व सर्वकाळीं सर्वांस ग्राह्य आहेत. जगाच्या उत्पत्तीपासून आजपर्यंत लक्षानुलक्ष प्राणी होऊन गेले आहेत, परंतु ज्यानें परार्थ ह्मणून आपलें शरीर झिजविलें त्याचीच कीर्ति अजरामर राहिली आहे. अशाच महात्म्या पुरुषांचीं चरित्रें निरंतर लोकनिदर्शनास असणें योग्य आहे. हें जाणून ज्यानें परोपकारार्थ तनमनधन अर्पण करून आपलें सगळें आयुष्य परोपकारार्थच घालविलें, अशा प्रकारच्याच एका पुरुषाचें हें एक छोटेखानी चरित्र लिहिलें आहे. त्या सत्पुरुषाचें 'हातिम' हें नांव आहे. हा एक मोठा विख्यात राजा होता; परंतु राज्याचें सुख कसें असतें तें ह्याच्या स्वप्नीं देखील ठाऊक नव्हतें. ह्यानें आपलें सारें आयुष्य केवळ परोपकारांत दवडलें. अशांचें चरित्र लोकवाचनांत अवश्य यावें असा उद्देश योजून सांप्रत हें पुस्तक लिहिलें आहे. ह्यानें लोकहितार्थ जे खडतर कष्ट भोगले, तें वर्णन ऐकून क्षणमात्र तरी मनुष्याचे हृदयांत परोपकार करावा अशी इच्छा उत्पन्न झाल्यावांचून रहाणारें नाहीं. मनुष्याची अशी वृत्ति होऊन ती सदोदित टिकणें व त्या इच्छेनुरूप वर्तन घडणें हाच असलीं पुस्तकें वाचनापासून मुख्य फायदा आहे. तो फायदा ह्या पुस्तकाच्या वाचनापासून थोडा फार तरी साधेल अशी आशा धरून हें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. त्याचा सुज्ञजन आदर करतील अशी आशा आहे.

प्रकाशक.



# विषयानुक्रम.







श्रीगजानन.

# हातीमताई चरीत्र.

अथवा

# हसनबानूचे सात सवाल.



## भाग १ ला.

फार प्राचीन काळीं खोरासान प्रांतात एक विख्यात बादशहा होऊन गेला. त्याचे पदरीं अष्टप्रधान होते. त्याचें सैन्यही प्रचंड असे. संपूर्ण अधिकारी अष्टौप्रहर आपल्या कामीं तत्पर असत. न्यायाचेवेळीं तो पोटच्या पोराचाही पक्ष घेत नसे. त्याच्या सत्ताबलानें वाघ व गाय एके वेळीं एकेच स्थळीं पाणी पीत असत! त्याच वेळीं त्याचे नगरांत बरजख नावाचा एक महा उदार व अत्यंत संपत्तिमान असा व्यापारी असे. अनेक लांबलांबचे शहरीं त्याचे गुमास्ते व्यापाराकरितां हिंडत असत. त्याची व बादशहाची परम मैत्री असे. कालगतीनें तो व्यापारी मरणास टेंकला. त्यास फक्त हसनबानू नांवाची एक कन्या होती. त्यावेळीं तिचें वय अवघें बारा वर्षांचें होतें. त्यामुळें त्यानें बादशहास घरीं बोलावून आपली संपूर्ण दौलत व कन्या हीं त्याचे पदरीं घालून तो परलोकीं गेला. बादशहानेंही प्रामाणिकपणानें चालून पोटच्या मुलीप्रमाणें हसनबानूचें रक्षण करून ती वयांत येतांच सर्व संपत्ती तिचे स्वाधीन केली.

हसनबानू तारुण्यांत आल्यावर तिनें एके वेळीं आपल्या

प्रियकर दाईस ह्मटलें कीं, हा प्रपंच केवळ पाण्याच्या बुडबुड्या प्रमाणें क्षणभंगुर आहे. संपत्ती ही केवळ दोन प्रहरच्या सावली सारखी आहे, ह्मणून मला वाटतें कीं, ही सर्व दौलत दीन अनाथांस वाटून ह्या क्षणभंगूर सुखापासून अलिप्त होऊन संपूर्ण आयुष्य ईश्वर भजनांत घालवावें असें मला वाटूं लागलें आहे. मी तुला आईपेक्षांही जास्ती समजतें. त्यांतून माझी आई केव्हांच परलोकवासी झाली आहे. तर आतां तूंच माझ्या ह्या विचारास कांहीं योग्य उपाय सांग. हें ऐकून ती दाई मोठ्या प्रेमानें ह्मणाली, लाडके, तुझा विचार यथायोग्य आहे. परंतु परमेश्वरानें जर तुला मनुष्यजन्म दिला आहे तर तूं प्रपंच साधून परमार्थ साधावास. येणेंकरून परमेश्वरास फार आवडशील. ह्मणून तुला सांगतें कीं, मला एका साधूनें सात प्रश्न सांगितले आहेत. ते लिहून तूं आपल्या दरवाजावर चिकटव. व जो कोणी त्या सातही प्रश्नांचा जबाब देईल त्या बरोबर तूं लग्न लाव. ह्मणजे तुझा प्रपंच व परमार्थ साधून तूं पूर्ण सुख पावशील. हसनूबानू ह्मणाली ठीक आहे. तुझी आज्ञा मला मान्य आहे. कोणचे सात प्रश्न तें कृपाकरून मला सांग. तेव्हां दाई सांगती झाली कीं,

प्र० १ ला— "एक वेळ पाहिलें आहे पण पुन्हां पाहण्याची हौस आहे."

प्र० २ रा— "चांगलें कर व पाण्यावर टाक."

प्र० ३ रा— "कोणाशीं दगा करूंनको, करशील तर तसेंच फळ पावशील."

प्र० ४ था— "खरें बोलणारा नेहमी सुख पावतो."

प्र० ५ वा— "कोहनिदा" असा आवाज करणाऱ्या पहाडाची गुप्त खबर आण."

प्र० ६ वा— "पानकोंबड्याच्या अंड्यायेवढें एक मोतीं

मजजवळ आहे, त्याच्या जोडीचें दुसरें आण."

प्र० ७ वा— "हमाम बादगिर्दची खबर आण."

हे सात प्रश्न ऐकून हसनूबानूस मोठी उत्कंठा प्राप्त झाली. तिला वाटलें कीं, येव्हढ्या सातही प्रश्नांचा उलगडा करणारा चतूर, समर्थ व दृढउद्योगी असा पुरुष विरळा असल. तस्मात त्याची मला प्राप्ति घडून मी सुखी होईन ही गोष्ट परम दुर्घट आहे, असें तीस वाटून ती चिंतायुक्त होऊन काल-क्रमणा करीत राहिली.

पुढें कांहीं दिवस लोटल्यावर एके दिवशीं ती खिडकीशीं उभी असून रस्त्याकडे पाहत असतां एक वृद्ध साधू मार्गानें चालला होता. त्याचे बरोबर चाळीस शिष्य होते. ते सो-न्याच्या विटा पुढें मांडीत, व तो साधु त्या विटांवर पाय देऊन मार्ग चालत असे. हा अलौकिक प्रकार पाहून बानूस परम आश्चर्य वाटून तिनें "हा काय प्रकार आहे" हें दाईस वि-चारलें. तेव्हां ती ह्मणाली–हा साधु राजगुरू आहे; राजा महिन्यांतून दोन वेळां त्याचे दर्शनास जातो. कधीं कधीं हा राजाचे भेटीस जातो. हें ऐकून बानू ह्मणालीः—आई, तुला जर ठीक वाटत असेल तर ह्या साधूस घरीं बोलावून मी त्याचे चरणीं लीन होईन. दाई ह्मणाली—ठीक आहे, तुला वाटेल तेव्हां बोलाव. नंतर एक दोन दिवसांतच बानूनें आपला हेतु त्या साधूस सेवकाकडून कळविला. तेव्हां साधु ह्मणाला— ठीक आहे. जो कोणी आह्मास पाचारण करील त्याचे घरीं जाणें योग्य आहे. 'नाहींतर आह्मी ईश्वराचे अन्यायी होऊं. असो, तर उद्ईक सकाळीं मी बानूचे घरीं येईन. ह्या प्रमाणें त्यानें त्या बानूच्या सेवकास सांगितलें. तो निरोप ऐकतांच बानूस परम संतोष झाला. तिनें साधूसाठीं आपला महाल फारच उत्तम प्रकारें शृंगारून अनेक प्रकारचीं उंची प-

कानें तयार केलीं. नंतर कोंबडा आरवण्याचे वेळीं उठून शुचिर्भूत होऊन तिनें उजाडण्याचे पूर्वीच त्या साधूकडे आपल्या सेवकास पाठविलें.

त्या गृहस्थाचा वेष मात्र अगदीं विरक्त साधू सारखा होता परंतु आंतून तो लोभानें भरून गेला होता. त्याचे सारखा निर्दय व दुष्ट जगांत कोणी नव्हता. त्याचे शिष्यही त्याचप्रमाणें महा खळ होते. त्याला देहान्त शिक्षेपेक्षांही कठोर शिक्षा योग्य असे. असा तो महा दुष्ट पुरुष असून चमत्कार हा कीं, बादशहा त्याला परम पूज्य मानी, व तो साधू मोठा ठक असे. नित्य दुष्ट कर्मं करी, परंतु त्याचा कोणासही मागमूस लागूं देत नसे. असो. असा तो लबाड साधु आज आपले घरीं येणार ह्या मुळें त्या अज्ञान बानूस परम आल्हाद वाटून तिनें मुख्य दरवाजापासून तों तहत मुख्य दिवाणखान्यापर्यंत एक सारखी भरगच्ची बैठक तयार केली होती. साधू येतांच बानूनें मोठ्या आदरानें त्याचें आगत करून ज्या दिवाणखान्यांत त्याचे साठीं एक उंच व सुशोभीत बैठक तयार केली होती तीवर स्वारीला बसवून भेट ह्मणून जवाहिरांनीं भरलेलीं रुप्याचीं तबकें त्याचे पुढें ठेविलीं. तीं पाहतांच साधूचें अंतःकरण तर पाघळलेंच. परंतु घेतलेल्या ढोंगाच्या संपादणीसाठीं स्वारी गंभीरवाणीनें ह्मणाली.—'छी, छी, हें काय? आह्मांला ह्या लोभकारक वस्तूंचा गंधही नको, उचला हें येथून' तें ऐकून बानूनें त्या सर्वांस दुसऱ्या एका सुरेख जागेंत नेवून तेथें त्यांचे साठीं उत्तम पोषाक तयार करून ठेवले होते, ते ती त्यां सर्वांस देत असतां साधूनें त्याचाही धिक्कार केला. मग बानूनें त्यां सर्वांस तिसऱ्या एका दालनांत नेलें. तेथें चोहोंकडे भर जरीचे गालीचे हंतरले होते, खिडक्यांवरून जरीचे पडदे लाविलें होते, मधोमध एक बिलोरी शंभर फाणसांचा झुंबर

वळ बसवून ह्मटलें, अहो इमनचे बादशाहा हातिमा, आपण असे रानोरान कां बरें हिंडता ? हातिमानें त्यास प्रवासाचें स-मग्र वर्तमान सांगितलें. तें ऐकून तो ऋक्षराज ह्मणाला, आपण येथें आलां हें फार चांगलें झालें, कांकीं माझी एक कन्या सांप्रत उपवर झाली आहे, ती आपणासच योग्य आहे. हातिमानें तें ऐकतांच तोंड खालीं घातलें. तेव्हां ऋक्षराज ह्मणाला महाराज आपण बोलत कां नाहीं, आपण मानव व मी श्वापद ह्यावर जाऊं नका, माझी कन्या आपलेच जातीची आहे. तीस पहा आणि काय तें कळवा. इतकें बोलून सेवकाकडून त्यास कन्येच्या महालांत पाठविलें. ती अप्सरातुल्य कन्या पाहतांच हातिम ह्मणाला, हे राजाधिराजा तूं महान थोर आहेस व मी यकःश्चित मानव आहें. ऋक्ष ह्मणाला, पुरे पुरे तूं महा परोपकारी इमनचा बादशाहा हातिम हें मी ओळखतों. तें ऐकून हातिम विचार करूं लागला कीं, स्त्रीपाशांत बद्ध होण्यासाठीं आपण प्रवाशीं निघालों नाहीं, तेव्हां हा व्यर्थ खोळंबा योग्य नाहीं. असा तो विचार करतो तोंच ऋक्षराजानें त्यास स्पष्ट सांगितलें कीं, जर तूं माझें बोलणें नाकारशील तर मी तुला प्रतीबंधांत ठेवीन, तरी हातिमानें कांहीं उत्तर न दिल्यामुळें त्यास अन्नपाण्यावांचून अंधाऱ्या गुहेंत कोंडून बसावें लागलें.

नंतर पंधरावे दिवशीं ऋक्षराजानें त्यास बाहेर काढून खाण्यापिण्यास देऊन पूर्ववत प्रश्न केला, त्याहीवेळीं हातिमानें अमान्य केल्यामुळें पुन्हां त्यास कोंडून बसावें लागलें. नंतर एकदां हातिमास गाढ निद्रा लागली असतां एका महंतानें त्यास स्वप्नांत सांगितलें कीं, तुला ह्या ऋक्षकन्येशीं लग्न करून नंतर तिच्याकडूनच आपली सुटका करून घेतल्यावांचून दुसरा उपाय नाहीं. ह्या स्वप्नामुळें हातिमानें त्या ऋक्षकन्येशीं लग्न लावून नंतर पुढें तिच्याशीं अत्यंत प्रेमभावानें वागून सहा म-

हिन्यानें तेथून आपली सुटका करून घेतली. जातांना ऋक्षकन्येनें त्यास एक मोतीं देऊन त्या बद्दलचे अनेक गुण त्याला सांगितले.

हातीम तेथून निघून मार्ग क्रमीत असतां कांहींकां दिवसांनीं त्यास वाळुकामय प्रदेश लागला. तेथून जात असतां पर्वतप्राय अजगरानें त्याला गिळून टाकलें. परंतु आस्वल कन्येनें दिलेल्या मोत्याचे अंगीं जादूचे योगानें तें ज्याचेजवळ असेल त्यास विष, अग्नि ह्यांची बाधा व्हावयाची नाहीं असा गुण असल्यामुळें हातिम त्याचे पोटांत खुशाल ईश्वर भजन करीत राहिला. नंतर दोन दिवस झाले तरी खाल्लेला प्राणी पचत नाहीं असें पाहून अजगरानें त्यास ओकून टाकलें. त्यावेळीं ईश्वराचे परम आभार मानून हातीम आपले परोपकाराच्या कामासाठीं जाता झाला. पुढें त्यास एक नदी लागली. तींत सर्पाच्या गरळेनें भरलेलीं आपलीं वस्त्रें धुवावीं अशा इराद्यानें तो जो पाण्यांत पाय ठेवतो तोंच वरचा भाग मानवाकृति व खालचा भाग मत्स्याकृति अशा एका स्त्रीनें त्यास पकडून सुमारें दहा दिवस त्यास आपले जवळ ठेऊन घेऊन पुन्हा लवकरच भेट देण्याच्या करारानें त्यास पूर्व स्थळीं आणून सोडलें. नंतर हातीम आपलीं वस्त्रें स्वच्छ करून तेथून पुढें चालता झाला.

नंतर कांहीं दिवसांनीं एक प्रचंड पर्वत त्याला लागला, त्याची शिखरें मेघमंळास भेदून गेलीं होतीं व त्यावरील वृक्ष गगनमंडळास लागले होते, त्यांची छायाही उत्तम असून पत्रपुष्पांनीं ते अगदीं लवले होते. वरील सपाटीवर जिकडे तिकडे उत्तम स्वच्छता असून तेथें एक सुंदर बगीचा राखला होता, व स्थळों स्थळीं आराम स्थळेंही बहुत होतीं. असें तें मनोरम स्थळ पाहून हातिमास मोठा आनंद झाला, व तो तेथेंच एका बैठकीवर पडला; तोंच श्रमामुळें त्यास

गाढनिद्रा लागली. इतक्यांत त्या बागेचा धनी तेथें येऊन त्याचे शेजारीं बसला. कांहींका वेळानें हातिम जागा होऊन आपले शेजारा कोणी मनुष्य आहे असें पाहून त्यानें त्यास सलाम केला. त्यानेंही त्यास सलाम करून कोठें जातां' असें विचारलें. तेव्हां 'हौदाचे आरण्यांत जातों' असें हातीमानें त्यास सांगितलें. तें ऐकून तो बागेचा धनी ह्मणाला, वेडा तर नाहींस. अरे तें अरण्य ह्मणजे शुद्ध इंद्रजालाचा बाजार आहे, आजवर कैक पुरुष तेथून जाऊन वेडे बनून वनोवनीं भटकत आहेत? तर हा नाद सोडून आपले घरचा मार्ग धर. तेव्हां हातिमानें त्यास कच्चें वर्तमान सांगितलें. तें ऐकतांच गृहस्थ ह्मणाला, अरे परासाठीं आपला जीव धोक्यांत घालणारा असा तूं बादशहा हातीम आहेस वाटतें. आतां हें पक्कें लक्षांत ठेव कीं, त्या अरण्याचे आरंभींच तुला बहुत स्त्रिया भेटतील. त्या मोठ्या चेटक्या आहेत. त्यांच्यांत एक फारच लावण्याची खाण आहे ती तुला बहुत मोह घालील, त्यावेळीं तिला भुललास तर वेडा झालाच ह्मणून समज, आणि न भुललास तर परत येशील. इतकें बोलणें होत आहे तोंच एका चाकरानें सुरेख पक्कान्नांचीं ताटें तेथें आणलीं. नंतर त्या गृहस्थानें खूब आग्रह केल्यावरून हातिम त्याचे बरोबर जेवला व रात्रीं त्याचे बंगल्यांत विश्रांती घेऊन मोठ्या पहाटेस त्याची रजा घेऊन चालता झाला.

जातां जातां कांहींका दिवसांनीं तो एका सुंदरशा तळावा जवळ गेला, व त्याची उत्तम शोभा पाहत आहे तोंच आंतून एक नग्न अप्सरा बाहेर पडली. तिला पाहतांच बागेच्या धन्याची गोष्ट हातीमाच्या मनांत उभी राहिली; व ह्या स्त्रीकडे ढुंकूनही पहावयाचें नाहीं असें जो तो आपले

मनांत घोकीत आहे तोंच तिनें त्यास पाण्यांत ओढून नेलें. कांहींका वेळानें तो पहातो तो एका उत्तमशा बागेंत आपण उभे आहोंत, व भोवताली हजारों सुंदर स्त्रिया उभ्या आहेत. असें पाहतांच तो अगदीं चकीत झाला. व ह्या मोह जालांत न पडण्या विषयीं मनोनिग्रह करूं लागला. पण काय सारें व्यर्थ. थोड्याच अवकाशानें एक फारच सुस्वरूप स्त्री याचे जवळ येऊन तिनें त्याचा हात धरून अतिशय उत्तम अशा एका बंगल्यांत त्याला नेलें. तेथें उत्तम रोषनाई केली असून मधोमध एक रत्न जडित सिंहासन होतें. त्यावर बसावेंसें हातिमास वाटून तो जों वर पाय ठेवतो तोंच एक गंभीर ध्वनि झाला. तरी तो न घाबरतां तेथील आलौकिक चमत्कार पहात तीन दिवसरात्र सारखा एके स्थळीं बसून राहिला. इतके दिवसांतून सर्वकाळ गाण्याचा मंजूळ ध्वनी मात्र त्याचे कानीं पडे व रात्रीं सूर्यासारखा लखलखित प्रकाश पडे. स्त्रिया त्याच्या पुढें खाण्याचे उत्तम पदार्थ ठेवीत ते खाई तरी त्याची क्षुधा शमन होत नसे. चौथे दिवशीं एक अत्यंत सुंदर स्त्री तोंडावर बुरखा घेऊन त्याचे पुढें आली तोंच त्याचा काम अनावर होऊन तो तिचा हात धरून तिचे तोंडावरील बुरखा काढूं लागला. इतक्यांत सिंहसनांतून एक स्त्री बाहेर पडून तीनें त्यास एकीकडे ओढून असा ठोसा मारला कीं, तो बेशुद्ध होऊनच पडला.

नंतर बऱ्याच वेळानें पाहतो तों एका घोर जंगलांत आपण आहोंत असें त्याच्या मनांत वाटलें. नंतर अंमळ उठून हिंडतो तोंच 'एक वेळ पाहिलें पण पुन्हां पाहण्याची हौस आहे, असे शब्द त्याचे कानीं आले. तेणेंकरून त्यास आनंद होऊन असे शब्द कोण बोलतो ह्याच्या तपासास्तव तो हिंडूं लागला. तो आठ दिवस हिंडला तरी नुसता शब्द त्याचे कानीं येई. बोलणारा

तिचे दृष्टीस पडला. त्यावेळीं त्याचा पूर्वीचा सूड उगवावा असें मनांत धरून वरकांती त्योपुढें नम्र होऊन एकवेळ आपले घरीं मेजवानीस येण्याचें त्याचेकडून कबूल करून घेतलें. व बरझाक व्यापारी जो तिचा बाप त्याचाच वाडा ह्मणजे आपलाच वाडा साधूस मेजवानीसाठीं राजाकडून मागून घेऊन सुमारें एक महिन्यानें तिनें त्याच वाड्यांत मेजवानीचा थाट केला. त्या दिवशीं कनातीचे पडदे, बाडबिछाने, सोन्याचें सिंहासन वगैरे पूर्वीप्रमाणेंच थाट करून तिनें साधूस तेथें बोलावून पूर्ववत बहुत नजराणा त्याचे पुढें ठेवला. साधूनेंही पूर्ववतच त्या बद्दल आपली निस्पृहता दाखविली, व भोजनोत्तर तो बानूस आशिर्वाद देऊन शिष्यवर्गासह तो निघून गेला. इतकें झाल्यावर बानूनें शहरच्या कोतवालास सांगून ठेवलें कीं, कांहीं दरोडेखोर आज रात्रीं माझे घरावर दरोडा घालणार आहेत असा मला सुगावा लागला आहे. त्यास तुह्मी पाळतीवर रहावें, व घरच्याही सर्व चाकर नौकरांस असेंच कळविलें.

नंतर आपले क्रमाप्रमाणें तो साधु शिष्यांसह बानूचे घरावर दरोडा घालावयास आला. तेव्हां उघडच मुद्यासुद्धां तो पकडला जाऊन राजापुढें त्यास हजर व्हावें लागलें. तें त्याचें दुष्टकृत्य राजाचे नजरेस येतांच राजानें शिष्यासह त्यास सुळीं देऊन त्याची जिनगी जप्त केली. तेव्हां बानूचें पूर्वीचें द्रव्य व तसेंच इतरांचें पुष्कळ द्रव्य, चोरीचीं वस्त्रें त्याचे घरांत सांपडलीं. तेणेंकरून बानूला व्यर्थ हद्दपार केल्याबद्दल राजा मनस्वी खेद झाला. परंतु हा सावकारपुत्र तोच ती बानू हें राजाला कळल्यामुळें त्याला पराकाष्टेचा आनंद झाला. आणि मग राजानें बानूस नगरांतच राहण्यास सांगितलें. बानू ह्मणाली—तें ठीक आहे, परंतु हौसेनें जें मीं नगर बांधलें तेथें मी रहावें व वेळोवेळ आपीच उभयताची भेट

व्हावी येवढी माझी हौस पूर्ण झाली पाहिजे. हें राजानें मान्य केल्यावर तिनें लवकरच एकवेळ शहास आपले नगरीं बोलावलें. शहानें तिचें भाषण मान्य केलें व आपल्या लवाजम्यासह तो शहाबाद शहरीं आला त्यावेळीं बानूनें सर्व नगर शृंगारलें होतें. नंतर आनंदाच्या गोष्टी होऊन तिला जें अपरमित द्रव्य प्राप्त झालें होतें तें शहास दाखवून घ्यावयास सांगितलें, तेव्हां तोही लोभाविष्ट होऊन घेऊं लागला तों द्रव्याऐवजीं त्याला सर्प, विंचू वगैरे विषारी प्राणी दिसूं लागले, तो अद्भुत प्रकार पाहुन तें बानूच्या नाशिबातलेंच द्रव्य आहे असें ह्मणून त्याची आशा सोडली, व लागलाच बानूचा निरोप घेऊन तो स्वनगरीं येऊन पोंचला.

मग बानूनें बहुत द्रव्य खर्चून आपले नगरांत मोठमोठ्या धर्मशाळा बांधून वाटसरांस तेथें पाहिजे तें मिळण्याची उत्तम व्यवस्था लावून ठेवली. ह्या तिच्या उदारपणानें चोंहीकडे तिची कीर्ति पसरत जावून ज्याला त्याला ती हवीशी वाटूं लागली.

---

## भाग दुसरा.

बानूची कीर्ति बरीच लांबवर जातां जातां खारजिम नगरचा राजपुत्र मुनीरशहा याचे कानीं गेली. तेव्हां अशा कीर्तिमान स्त्रीला पहावें अशी त्यास बहुत उत्कंठा प्राप्त झाली, ती साधण्यास त्यास अनेक अडचणी असल्यामुळें त्यानें एका सर्वोत्कृष्ट चितान्यास बरेंच द्रव्य देऊन हस्नबानूची तसबीर आणविण्यासाठीं रवाना केलें. मग थोड्याच दिवसांनीं तो चितारी शहाबादेस जाऊन त्यानें बानूची भेट घेऊन आपलें कसब तिला कळवून तिचे आश्रयास राहिला. ह्यानंतर थोड्याच दिवसानें आपली तसबीर काढण्याविषयीं बानूच्या मनांत येऊन तिनें चितान्यास तसें कळविलें. तो फारच कुशल पुरुष! त्यानें

बानूस एका उंचशा जागीं उभें करून पाण्यांत तिचें प्रतिबिंब पाहून तिची तसबीर उतरली, व तत्काळ तिच्या दोन प्रति करून एक तिला दिली. नंतर आपलें इष्टकार्य झालें असें जाणून तो बानूची परवानगी घेऊन खारजिम शहरीं गेला, व राजपुत्रास बानूची तसबीर देऊन संपूर्ण वर्तमान कळवून खुष करता झाला.

ती तसबीर पाहतांच तो कामबाणानें अगदींच विव्हळ झाला, व लागलाच दुसरे दिवशीं शिकारीचे निमित्तानें घरांतून बाहेर पडून फारच थोड्या अवकाशांत शहाबादेस पोंचून एका धर्मशाळेंत उतरला. पांथिकांच्या व्यवस्थेबद्दल तेथें बानूचे लोक होतेच. पण राजकुमारानें त्यांच्या जवळच्या कोणच्याच वस्तूचा स्वीकार केला नाहीं. हा असा प्रवाशी तेथील नोकरांस आजच एक भेटला. ह्मणून त्यांस मोठें नवल वाटून त्यांनीं बानूकडे त्याची वर्दी लावली. तिलाही थोडें आश्चर्य वाटून तिनें त्याची गांठ घेऊन त्याची पुसतपास चालविली. तेव्हां त्यानें आपला संपूर्ण इतिहास तिला कळविला. तेव्हां ती ह्मणाली— महाराज, आपला हेतु फारच कठीण आहे. कांकीं, माझे सात प्रश्न आहेत, त्यांचा जो जबाब देईल त्यासच मी वरीन असा माझा संकल्प आहे. राजकुमार ह्मणाला, ठीक सांग तुझे प्रश्न. मग "एकवेळ पाहिलें आहे पण पुन्हां पाहण्याची हौस आहे" हा पहिला प्रश्न सांगून बानू ह्मणाली—असें बोलणारा कोणी एक मनुष्य आहे त्याची कच्ची हकीगत शोधून आण, मग दुसरा प्रश्न सांगेन. व तूं जर सातही प्रश्नांचा उलगडा करशील तर मी मोठ्या आनंदानें तुजशीं लग्न करीन. तें ऐकून केवळ प्रारब्धाची परीक्षा असें मानून तो एक वर्षाची मुदत करून तेथून फकीराच्या वेषानें चालता झाला.

राजकुमार मग मार्गस्थ झाल्यावर मोठा चिंताक्रांत होऊन

जातां जातां बऱ्याच दिवसांनीं यमन शहरच्या मैदानांत जाऊनें इष्टकार्य साधण्याचें अङ्कुर कोठेंच कांहीं जुळेना; ह्मणून तेथें तो केवळ आक्रोश करीत बसला. कर्मधर्म संयोगानें त्यावेळीं यमनचा बादशहा परम कृपाळु, निग्रही, परोपकारार्थ आपला प्राणही वेंचणारा असा हातिम तेथेंच शिकारीस आला. त्याचे कानीं हे शोकशब्द जातांच त्यानें शोध काढून त्याची गांठ घेऊन त्याचे समग्र वर्तमान विचारून घेतलें. व ही परोपकाराची फारच उत्तम संधी साधली तरच आपलें नांव हातीम असें त्यास वाटून ' तुझें कार्य मी साधीन ' असें बेधडक बोलून त्यानें राजपुत्रास आपले नगरांत नेलें व एक दोन दिवसांतच राज्याची सर्व बंदोबस्ती करून तो मुनीरशहास बरोबर घेऊन शहाबादेस बानूचे भेटीसाठीं आला. नंतर भेटीचेवेळीं त्यानें ह्मटलें, ' हसनबानू, मुनीरशहा हा केवळ माझा भाऊ आहे. तो तुझ्या प्रीतीपाशांत गुंतून गेल्यामुळें अगदींच हतवीर्य झाला. तरी आतां मी जर तुझ्या प्रश्नांचा उलगडा केला तर तूं ह्याशीं लग्न लावण्यास खुशी आहेस ?' तें ऐकून परासाठीं आपला जीव कष्टविणाऱ्या हातीमाबद्दल तिला फार आश्चर्य वाटून तिनें त्या गोष्टीस मोठ्या संतोषानें मान्यता दिली, व हातीमाचीही बरीच प्रशंसा केली. मग हातिमानें ह्याबद्दल दोन साक्षीदारानिशीं तिच्यापासून करारपत्र लिहून घेऊन मी परत येईपर्यंत ह्या राजकुमारास येथेंच ठेऊन ह्याची उत्तम जतन कर असें त्यानें तिला सांगितलें. तें तिनें मान्य करून एक अर्धा दिवस हातिमास ठेऊन घेऊन त्यास उत्तम मेजवानी दिली, व त्याचे समक्षच एका उत्तमशा बंगल्यांत मुनीरशहाची व्यवस्था त्याचे मनाप्रमाणें लावून टाकली. इतकें झाल्यावर हातीम मोठ्या संतोषानें हसनबानूच्या पहिल्या प्रश्नाचें उत्तर आणण्यासाठीं शहाबादेहून निघाला.

# सवाल पहिला.

## एकवेळ पाहिलें, पण पुनः पाहण्याची हौस आहे.

वरील प्रश्नाविषयीं हातिमास कांहींच माहिती नव्हती. तरी केवळ परोपकारार्थ ईश्वरावर भरंवसा ठेऊन मार्ग क्रमूं लागला. तो कांहीं दूर गेल्यावर जिला आपल्या लेंकराविषयीं प्रेमपान्हा उत्पन्न होऊन जिचे स्तनांतून दूध गळत आहे व मागें लांडगा लागला असल्यामुळें पळतां पळतां घामाघूम झाली आहे, अशा हरिणीस पाहून हातिमास दया येऊन तो ह्मणाला— रे लांडग्या, उभा रहा. तूं भुकेला आहेस खरा पण त्या हरणीस मारूं नको सांप्रत ती आपत्याच्या मोहांत आहे. तें ऐकून लांडगा ह्मणाला, शाबास शाबास. तूं इमनचा राजा हातिम असावास. कांकीं दुसऱ्याचें संकट पाहून दया येणारा एक साऱ्या जगांत हतीमच आहे अशी चौहींकडे त्याची कीर्ति आहे. असो, ती हरणी तर गेलीच आतां माझ्या खाण्याची कांहीं व्यवस्था करणें तुला योग्य आहे. मांसा वांचून दुसरें मात्र कांहीं नको. देत असल्यास तुझ्या मांडीचें मांस दे. तें ऐकून हातीमानें चटकन तलवारीनें मांडीचें मांस कापून त्याची क्षुधा शांत केली. नंतर राज्य सोडून घोर अरण्यांत येण्याचें कारण लांडग्यानें विचारल्यावरून हातिमानें त्यास कच्ची हकीगत सांगितली. तेव्हां लांडगा ह्मणाला, असें वाक्य बोलणारा मनुष्य बहुधा 'हौदा' नांवाच्या अरण्यांत सांपडावा असें माझें अनुमान आहे. तें अरण्य बहुत दूर आहे तरी येथून थोडी मजल काढल्यावर दोन रस्ते लागतील त्यांपैकीं उजव्या हाताच्या रस्त्यानें गेलें असतां इष्ट स्थळीं जाणें होईल. इतकें बोलून तो लांडगा निघून गेला.

मांडीवरील दुःखापतीनें हातिमाच्यानें पाऊल टाकवेना ह्मणून

तो तेथेंच एका वृक्षाखालीं विव्हळ होऊन पडला. त्या वृक्षाचे ढोलींत एक कोल्ह्याचें जोडपें रहात होतें, तें अस्तमानाचे वेळीं तेथें आलें. तेव्हां हातिमास पाहून कोल्ही ह्मणाली, आतां येथें राहणें ठीक नाहीं. कांकीं, येथें मनुष्यप्राण्याचा रिघाव झाला. आपला सुगावा लागतांच हा आपला नाश करील तर येथून चलाच माघारे. कोल्हा ह्मणाला, तें खरें. परंतु जो दुसऱ्यासाठीं आपला जीव देणारा, महा दयाळू असा हा इमनचा बादशाहा हातिम आहे. ह्याचे पासून काडीची भीति नाहीं. कोल्ही ह्मणाली, हें तुह्मी कशावरून जाणलें. तो ह्मणाला, माझ्या गुरूनें मला सांगितलें कीं, एके दिवशीं महा उदार, परोपकारी हातिम नांवाचा बादशाहा मांडीवरील मांस कापल्याच्या दुःखानें दुःखित होत्साता तुझ्या घरीं येईल. तो दिवस आजचाच आहे. त्यावरून मी जाणलें कीं, हा हातीमच आहे. त्याच्या दुःखाला औषधही त्यानें मला सांगून ठेवलें आहे. कोल्हीनें विचारलें, ह्यास येथें येण्याचें कारण काय? व मांडीवरचें मांस कसें नाहींसें झालें असेल बरें? तें ऐकून कोल्ह्यानें तीस कच्ची हकीगत सांगून ह्मटलें, आतां ह्याच्या या रोगाला औषध माझान्द्राना नांवाच्या अरण्यांत परो नांवाचा एक पक्षी आहे त्याचा मेंदु ह्या जखमेवर लावल्यानंतर एका तासाच्या आंत ह्याची मांडी पूर्ववत होईल. तें अरण्य फार दूर असून मार्ग फार खडतर आहे. जातां येतां सात दिवस मोडतील. तर तूं येथें ह्याची नीट जतन कर; मी हा आलोंच समज. असें बोलून कोल्हा चालता झाला. हातिमास त्यांची भाषा येत होती, परंतु वेदनेमुळें त्याच्यानें कांहींच बोलवेना ह्मणून तो निचेष्ट पडून राहिला.

इकडे तो कोल्हा मोठ्या वेगानें चालून त्या अरण्यांत गेला, तोंच सुदैवानें तो पक्षीही एका झाडा खालीं झोंपीं

आहे, " दुसरा प्रश्न, प्रत्येक गुरुवारीं रात्रीं एक मनुष्य असें ह्मणत असतो कीं, आज मला उपयोगीं पडेल असें मीं कांहीं केलें नाहीं, हा मनुष्य कोण व तो कां बोलतो. तिसरा प्रश्न, महापरी नांवाच्या गंधर्वकन्येजवळ शहामोरा नांवाचा हिरा आहे तो आणून देणें " असे तिनें आपले तिन्ही प्रश्न मला सांगितले. ते ऐकून मुकाट्यानें सर्व जिनगी तिचे स्वाधीन करून ह्या स्थळीं येऊन शोक करीत बसलों आहें.

हातीम ह्मणाला, येवढें मी तुझें काम साधून देतों चल. असें बोलून तत्काल सावकारकन्येची गांठ घेऊन ती व तिचा बाप हारिथ ह्यांपासून असा रुकार करून घेतला कीं, प्रश्नांचा उलगडा केल्यावर मी सांगेन त्यास हिनें वरलें पाहिजे. तसेंच मजकडून प्रश्नांचा उलगडा न झाल्यास माझें शीर उडवावें. ही गोष्ट उभयतांस मान्य होऊन चुकली. नंतर त्या गृहस्थास धर्मशाळेंत राहवयास सांगून थोडेसे बदाम व गुहा दाखविण्यासाठीं व खात्री पटण्यासाठीं कांहीं चाकर हारिथा पासून घेऊन हातीमाची स्वारी चालती झाली; ती तडत गुहेमध्यें शिरली.

तेथें गाढ अंधकार होता, त्यांतून बराचवेळ सारखा चालून गेल्यावर थोडासा प्रकाश दिसूं लागला. तेणें करून त्यास खूप हुशारी येऊन पुढें गेला तों त्यास उत्तम मैदान लागलें. झालें त्याचें कार्य येव्हढेंच होतें. तरी सांगण्या सारखा कांहीं चमत्कार न आढळल्यामुळें बरोबरीच्या लोकांस तेथेंच रहावयास सांगून तो एकटाच पुढें सरला. पुढें त्याला सुंदर प्रदेश लागला. तेथें सुंदर पाणी पाहून थोडेसे बदाम खाऊन व पाणी पिऊन हातीम बराच शांत झाला. नंतर अशाच क्रमानें दोन चार दिवस तो त्या रानांतून जात असतां एक मोठा तट त्याचे दृष्टीस पडला. त्याचे आंत मोठें शहर असून तेथें सारी वस्ती राक्षसांची होती. असो. मग हातीम

त्या नगरांत गेला. तोंच कांहीं राक्षसांनीं त्यास पकडून खा-ण्याचा विचार केला. त्यावेळीं नरमांस हें श्रेष्ठ आहे तें आपल्या राजास न देतां आपण खाल्लें तर मोठा गुन्हा केला असें होईल सबब राजाला हा नजराणा करावा असा त्यांचा विचार ठरून ते त्याला राजाकडे घेऊन चालले. इतक्यांत दुसऱ्या एका जमावानें त्यांवर हल्ला केला. ह्या प्रसंगीं हातीम मरावाच पण वांचला. कारण त्यांपैकी एकजण ओळखून ह्मणाला, अरे ह्याला मारूं नका. कांकीं आपली राजकन्या कैक दिवस हैराण आहे, व मानवी औषधापासूनच तिला गुण येणारा आहे. त्यामुळें सरकारानें पुष्कळ मनुष्य पकडून आणून त्यांचेकडून उपाय करून गुण न आल्यामुळे त्यांस बंदित टाकलें आहे. शिवाय सरकारासही कैकादिवस पोट दुखीचा उपद्रव आहे. तर ह्यास फाडून खाणें मोठा गुन्हा होईल, सरकाराकडेच न्यावें हें योग्य. ह्यामुळें हातीमाची ह्याही वेळीं सुटका होऊन तो राक्षसांबरोबर चालला. जातां जातां तो तीस राक्षसांच्या टोळीच्या हातीं लागला. त्यांनीं लागलेंच त्याला आपल्या नायकाकडे नेलें. त्या नायकाचे बायकोस कांहीं नेत्ररोग होऊन ती अगदीं हैराण होऊन गेली होती, व तेणेंकरून तो नाइकही चिंताक्रांत होऊन गेला होता. तो त्रासून ह्मणाला अरे ह्या मनुष्यास इकडे कां आणिलें, ह्याला मोकळें सोडून वाटेल तिकडे जाऊं द्या. ते यायोगें हातिम तर मोकळा झालाच. पण मग त्या नायकास त्याचें दुःखाचें कारण विचारून त्याचे कडून त्यांच्या राजाकडे नेण्याचें वचन घेऊन एका भाड्यांत पाणी भरून त्यांत ते बहुगुण संपन्न आस्वल कन्येचें मोतीं कांहीं वेळ टाकून तें पाणी दोन तीन वेळ तिचे डोळ्यांस लावून सर्व दुःख नाहींसें केलें. तेणेंकरून नायकास मोठा संतोष होऊन

त्यानें यथाशक्त्या हातिमाचा सत्कार करून त्यास आपले राजाकडे नेऊन राजाला एकांतीं त्याच्या वैद्यकीच्या गुणाबद्दल वर्तमान कळविलें. तेणेंकरून राजास मोठा संतोष होऊन त्यानें हातिमाची गांठ घेऊन त्यास आपल्या पोटदुखी बद्दल सांगितलें. हातिम ह्मणाला, बहुधा हा रोग उत्पन्न होण्यास कारण तुह्मी चाकर माणसांसमक्ष भोजन करतां हेंच होय. असो. ह्याला मी उपाय करीन. असें बोलून भोजनाचे वेळीं त्याचे ताटांतील थोडें अन्न एकीकडे झांकून ठेवविलें. नंतर सुमारें घटका दोन घटकेंतच तें उघडून पाहिलें तो त्यांत किडे पडलेले सर्वांच्या दृष्टीस पडले. तेव्हां हातीम ह्मणाला आतां तुह्मांला दुसरें औषध नको, फक्त एकांत स्थळीं भोजन करीत जाऊन चाकरांसही चांगलें अन्न देत जा. ह्याप्रमाणें कांहीं दिवस त्या राजाचें वर्तन चालल्यानें त्याची प्रकृती उत्तम होऊन त्यास मोठा संतोष होऊन ह्या उपकाराबद्दल तो हातीमास 'पाहिजे तें माग' ह्मणाला. तोंच त्यानें बंदींत ठेवलेल्या लोकांची सुटका करण्याचें मागितलें. राजानें तत्काळ तें मान्य करून सर्व लोकांस मुक्त करून वस्त्रालंकार देऊन त्यांची रवानगी केली. नंतर राजानें कन्येच्या अजाराबद्दल कळविलें. हातिमानें तत्काळ तिलाही त्या मोत्याच्याच योगानें बरें केलें. तेणेंकरून राजास परमानंद झाला. असो. इतकें झाल्यावर हातीम तेथून निघाला. त्यावेळीं राक्षसराजानें हातिमाची इच्छा नसतांही सोनें, मोतीं, जवाहीर, वगैरे बहुत नजराणा देऊन चाकरांकडून हातिमासुद्धां तो सर्व बोजा एका घटकेंत गुहेच्या तोंडापर्यंत आणून पोंचविला. नंतर तेथें असलेल्या चाकरांजवळ तो सर्व बोजा देऊन त्या गुहामार्गानें हातिम हारिताच्या कन्येकडे येऊन संपूर्ण हकीगत सांगून तिचा दुसरा प्रश्न जो 'जें मला आज उपयोगीं पडेल असें मीं कांहीं केलें नाहीं.' असें वाक्य बोल-

णाऱ्या मनुष्याचा शोध लावणें. हा ऐकून मित्राची गांठ घेऊन पुढें मार्गक्रमण करता झाला.

तो मार्ग क्रमीत असतां कितीएक दिवसांनीं गुरुवारच्या रात्रीं एका वृक्षाखालीं उतरला. तों कांहीं वेळानें वरील वाक्य त्याचे कानीं येऊं लागलें. तेव्हां हा कोण बोलतो हें शोधण्यासाठीं बोलण्याच्या रोंखावरून जाऊं लागला. परंतु तो सारी रात्र हिंडला तरी मनुष्य त्याला सांपडला नाहीं. आवाज मात्र सारखा कानीं पडत असल्यानें चालण्याचे योगानें फुकट श्रम मात्र झाले. मग हे शब्द फक्त गुरुवारचे रात्रींच होतात सबब पुढच्या गुरुवारपावेतों त्यानें कसे तरी तेथेंच दिवस लोटले. नंतर रात्रौ पूर्ववत शब्द कानीं येतांच तो त्याच्या शोधास लागला. परंतु तेव्हांही मागील प्रमाणेंच होऊन हिंडतां हिंडतां तो एका गांवांत शिरला. तेथील लोक त्यावेळीं एकत्र बसून शोक करीत आहेत असें त्याला दिसलें. तेव्हां शोधांतीं असें कळलें कीं, कोणी एक राक्षस दर बुधवारीं त्या गांवांत येऊन पाळी पाळीनें एकेकाच्या घरचा एक बळी घेऊन जातो. आणि जर त्याचा बळी चुकला तर एकदम सर्वांचा नाश करीन असा त्यानें धाक घालून ठेवला आहे. शिवाय त्या गांवच्या पाटलाच्या एकुलत्या मुलावरच येत्या बुधवारची पाळी असल्यामुळें सारे लोक रडतात असें त्यास कळल्यामुळें, प्रथम त्यानें त्याबद्दल मी बळी जातों असें सांगून त्यांचा शोक दूर केला आणि मग त्या राक्षसाचें नांव वगैरे कांहीं माहीत नसल्यामुळें हातिमानें त्या लोकांस त्या राक्षसाची आकृति काढावयास सांगितलें. ती पाहतांच ज्यास हस्त नसून ज्याचें शरीर फारच विशाळ, डोकें अगदींच लहान व ज्याचे अंगावर शस्त्र चालत नाहीं असा हा प्रसिद्ध हुल्लका नांवाचाच राक्षस आहे असें हातिमास पक्कें समजून तो आपोआप मरावा अशी त्यानें युक्ति केली. ती अशी

कीं, त्यानें पाटलाकडून फारच मोठा आरसा तयार करविला व त्यावर झांकण घालून तो राक्षस येण्याचे ठिकाणीं ठेवला. नंतर आज मी तुमचा शत्रु जो राक्षस यास ठार करतों, हा चमत्कार ज्यास पाहण्याची इच्छा असेल त्यानें चलावें असें बोलून तो राक्षस येण्याचे स्थळीं आला. भयामुळें त्याचे बरोबर कोणी आलें नाहीं तरी तो पाटलाचा पोर मात्र आला होता. असो. मग राक्षस येतांच 'हा तुझा भक्ष्य घे खा' असें बोलून हातिमानें आरशावरील झांकण काढलें. तोंच हा कोणी दुसरा राक्षस आहे असें त्यास आपल्याच प्रतिबिंबावरून वाटून तो इतका कांहीं गर्भगळीत होऊन गेला कीं त्याचा श्वासोश्वास बंद होऊन त्याचे शरीर फुगून फुटून गेलें. फारच भयंकर तो ध्वनि झाला. असो. मग त्या लोकांनीं ह्या उपकाराबद्दल हातिमास कांहीं द्रव्य देऊन सत्कारण्याचा विचार केला, पण त्यानें तें सर्व नाकारलें. पाटलानें त्यास आपले घरीं नेऊन त्याचें प्रवासाचें कारण विचारून घेतलें. तेव्हां तसले शब्द आह्मी ऐकतों पण थांग लागत नाहीं, असें त्या लोकांनीं त्याला सांगितलें. नंतर दुसरे दिवशीं गुरुवार होताच. त्या रात्रीं ते शब्द हातिमाचे कानीं येतांच तो त्याचे धोरणावर धांवत चालला, तो दोन महिने तसाच जंगलांत हिंडत होता. अखेरीस एका टेंकडीवर चढून पाहतों तों दूर सफेत पांघुरणें अंगावर धारण केलेलीं बरींच माणसें उभीं आहेतशीं दिसल्यावरून तो तेथें जातो तों ते सारे कोणा थोर मोठ्याचे पुतळे दिसले. तो चमत्कारिक देखावा पाहत हातीम तेथेंच विश्रांतिस बसला. मग रात्र झाली तेव्हां प्रचंड ध्वनि होऊन सगळ्या पुतळ्यांचीं मनुष्यें बनून उत्तम पोषाख करून उत्तमशा बैठकीवर विराजमान झाले. नंतर थोड्याच वेळानें त्या सर्वांनीं अमृत प्राशन केलें. त्याच मंडळींत एक मनुष्य अंगास राख व माती लावून शोकयुक्त होत्साता

एके बाजूस जमीनीवर पडला होता. त्याला अमृताचा एक थेंबही मिळाला नाहीं, ह्मणून तो मनुष्य 'जें मला आज उपयोगीं पडेल असें मी कांहीं केलें नाहीं.' ह्याप्रमाणें बोलून रडूं लागला. तें ऐकतांच हातिमास अत्यंत आनंद झाला. नंतर कांहीं वेळानें तेथें पक्वान्नांचीं भरलेलीं पुष्कळ ताटें आलीं. तीं प्रत्येकास मिळून एक शिल्लक राहिलें. त्यावेळीं त्यांतील एका मनुष्यानें 'हें ताट ह्या मुशाफरास द्या' असें बोलून हातिमास आपले शेजारीं घेऊन तें ताट त्याचे पुढें ठेविलें. नंतर सर्व मंडळी यथेच्छ जेवली. तो दुःखी मनुष्य मात्र सर्वांच्या तोंडाकडे पाहत रडत होता. कांकीं, त्याचेपुढें ताट असून सडकें कुचकें मांस पडलें होतें. ह्याबद्दल हातिमास वाईट वाटून त्यानें त्याबद्दल पुसतपास चालविली. तेव्हां 'ज्याचें त्यास विचारा' असा लोकांनीं जबाब दिल्यामुळें त्या मनुष्या जवळ जाऊनच हातिमानें त्याचें दुःखाचें कारण विचारलें.

तो ह्मणाला–बाबारे काय सांगूं. मी चीनदेशाचा युसफ नांवाचा व्यापारी आहें, हे सर्व लोक माझ्या चाकर नौकरां पैकीं आहेत. हे मोठे धर्मात्मे असत; ह्यांनीं उघड्यास वस्त्र, भुकेल्यांस अन्न, गरीबांस द्रव्य हीं वारंवार द्यावीं. तें पाहतांच माझ्या कपाळांत तिडका उठत. मी जन्माचा कृपण, माझी येव्हढी प्रचंड संपत्ती असून मी एक छदामही धर्मार्थ वेंचिला नाहींच, पण हे लोक धर्म करतांना मात्र मला पाहवत नसे. मी त्यांना ह्याबद्दल निषेध करी, रागें भरें, पण ते आपलें कर्तव्य केल्यावांचून राहत नसत. व उलट मला धर्म करण्याविषयीं उपदेश करीत. असो. एके वेळीं व्यापारासाठीं मी ह्या सर्वांसह खार्जिम शहरीं जात असतां वाटेंत चोरट्यांनीं आम्हांस गांठून आमचें द्रव्य लुटून आम्हांस ठार करून येथें पुरून ठेवलें. आमचे तुकडे तुकडे करून कोल्हा कुत्र्यास वांटून दिले नाहींत हे त्यांचे मोठे उपकार

होत. असो. आम्ही हे सर्व मृत अवस्थेंत असून ज्यानें जसें आचरण केलें तसें फळ भोगीत आहोंत. त्यांनीं धर्म केला त्या मुळें ते सुखभोगतात व माझी ही अवस्था आहे.

तें ऐकून हातिमास बहुत दया येऊन तो ह्मणाला असो. पण ह्याला कांहीं उपाय तुला ठाऊक असेल तर सांग ह्मणजे मी ह्या दुःखांतून तुझी सुटका करीन. व्यापारी म्हणाला—चीन देशांत माझ्या वाड्यांतील ज्या खोलींत मी निजत होतों, तेथें बहुत द्रव्य पुरलेलें आहे. तेथें हल्लीं माझे नातु रहातात. तेही दुःखानें बहुत पीडले आहेत. तर तेथें जाऊन तूं तें द्रव्य काढू-न त्यांतला एक हिस्सा नातवांस व तीन हिस्से गोरगरीबांस जर वांटून देशील तर मजवर तुझे अगणित उपकार होतील व मी ह्यांतून सुटेन. हातिम ह्मणाला ही गोष्ट मी खात्रीनें करीन, तूं चिंता करूं नकोस. इतकें त्यांचें भाषण होत आहे तों उजा-डून जाऊन ते सर्वलोक पूर्ववत पुतळे बनून जागचे जागीं स्थिर झाले; व हातीमही मार्गक्रमण करता झाला.

जातां जातां कांहींका दिवसांनीं त्यास एक विहीर लागली. तेथें एक मनुष्य पाणी काढीत होता. त्याचे जवळ हातीमानें थोडें पाणी मागितलें. इतक्यांत विहिरींतून एक प्रचंड सर्प बा-हेर पडून पाणी काढणाराच्या कमरेस विळखा मारून त्यास वि-हिरींत घेऊन गेला. त्याबद्दल हातिमास वाईट वाटून त्या मनु-ष्यास सर्पाचे तावडींतून न सोडविल्यास आपलें ब्रीद व्यर्थ आहे, असें त्याचे मनांत वागल्यानें विहिरींत त्यानें उडी टाकली. मग जमीनीस पाय लागतांच डोळे उघडून पाहतो तों एका सुंदरशा बा-गेंत उभे आहोंत असें त्याला दिसलें. नंतर तो त्या बागेची शो-भा पाहत हिंडत असतां एक रत्नखचित महाल त्याचे दृष्टीस पडला. त्यावरून कदाचित तो मनुष्य येथें असेल अशा कल्पने-नें तो त्या बंगल्यांत गेला. तों प्रथमच्या दिवाणखान्यांत एक

रत्नजडीत पलंगावर एक ब्रह्मराक्षस झोंपीं गेलेला त्याचे नजरेस पडला. तेव्हां त्यास जागें करून मनुष्याचा शोध करणार इतक्यांत तेथेंच एका कोंपऱ्यांत बसलेला तो साप हातिमाच्या नजरेस पडला. त्यासरसे हातिमानें त्याचें तोंड गच्च आंवळून धरलें. त्याचे हातून सुटण्याविषयीं सापानें बहुत तरफड केली, पण ती सारी व्यर्थ गेली. तरी त्याचे गडबडीनें राक्षस जागा होऊन 'अरे त्या माझ्या चाकरास सोडून दे' असें ओरडला. हातिम ह्मणाला ह्यानें माझ्या मित्रास आणलें आहे त्यास सोडल्यावांचून मी ह्याला कधीं सोडणार नाहीं. मग राक्षस सर्पास ह्मणाला, 'रे तो महाप्रबल पुरुष आहे, तूं आपलें तोंड गच्च संभाळून धर, नाहीं तर तुझ्या तोंडांत जो मार्ग आहे तेथें तो जाईल. तें ऐकतांच हातीम सर्पाच्या पोटांत शिरला. तेव्हां एका अंधाऱ्या कोठडींत आहोंत असें त्यास दिसलें, तेणेंकरून तो मोठ्या विचारांत पडला. इतक्यांत 'रे हातिमा येथें तुझ्या जें हातीं लागेल तें कापल्यावांचून येथून तुझी सुटका होणार नाहीं.' असे शब्द त्याचे कानीं आले. मग चाचपून पाहतां काळजासारखा कांहीं भाग त्याचे हातीं लागला; तोंच त्यानें आपले कट्यारीनें त्याचे दोन तुकडे केले. त्यासरसा भयंकर ध्वनी होऊन गडगडाट होऊं लागला. व थोड्याच वेळांत जिकडे तिकडे जळमय झालें. नंतर कांहीं वेळानें एका सपाट मैदानांत आपण उभें असून हजारों लोक शोकाक्रांत होत्साते आपले भोंवतीं उभे आहेत असें त्याचे दृष्टीस पडलें. तेव्हां 'येथें तुह्मी कसे आलां व शोकयुक्त कां' असें हातिमानें त्यांस विचारलें. तेव्हां एका सर्पानें आह्मांस येथें ओढून आणलें असेंच सर्वांनीं ह्मटलें. मग हातीम ह्मणाला तो सर्प मारला गेला. आतां तुह्मी आनंदानें आपले मुलांमाणसांत जा. तें ऐकून सर्वांस अतोनात हर्ष होऊन ते हातीमाचे आभार मानीतच मार्गस्थ झाले व हातीम चीन देशाच्या रस्त्याला लागला.

वाटेंत त्याला एक शहर लागून तो त्याच्या दरवाजाशीं जातांच तेथील रखवालदारांनीं त्यास अडवून ह्मटलें 'रे तूं कोठचा मुशाफर आहेस? आमच्या राजाचे परवानगी शिवाय आतां येथून तुझी मुटका नाहीं. हातिम ह्मणाला 'अरे प्रवाशांचा छळ करणें हा काय तुमच्या राजाचा कायदा? ते ह्मणाले–तें कांहीं आम्हीं जाणत नाहीं. आमच्या राजास एक कन्या आहे, ती येथें येणाऱ्या प्रवाशास तीन प्रश्न विचारते, त्याचीं त्यानें उत्तरें न दिल्यास ती त्यास ठार मारते. तेव्हां ज्याचें आयुष्य संपतें त्याला येथें येण्याची बुद्धि होते. तर आतां तुला राजाकडे गेलेंच पाहिजे. इतकें बोलून त्यांनीं त्यास राजवाड्यांत नेऊन गुदरलें. दोघांची मुलाखत होतांच राजा ह्मणाला रे प्रवाश्या, तुझें नांवगांव? हातीम ह्मणाला गांव ह्मणाला तर इमन देश असें मी सांगत असतों. असो. प्रवाशीलोकांस छळण्याचा जो तुमचा कायदा तो ऐकून मला फारच वाईट वाटतें. मुशाफरास कोणाच्याही प्रकारें गैर सोय न होतां त्यानें आपणास दुवा द्यावा अशी थोरांची चाल आहे. ती तुह्मी पतकराल तर तुमची चोहींकडे कीर्ति पसरेल. राजा ह्मणाला तें खरे, परंतु उपाय नाहीं. कांकीं, ह्या नगरास पूर्वी आदालताबाद ह्मणजे ( न्यायी ) असें नांव होतें, परंतु माझ्या कन्येच्या दुर्गुणावरून आतां ह्याला बेदादाबाद ( अन्यायी ) असें नांव पडलें आहे. ते तिचे दुर्गुण चांगलेही वाटत नाहींत व पोटच्यागोळ्यामुळें व एकुलती एकच असल्यामुळें तिचा नाशही करवत नाहीं. इतकें बोलणें होऊन राजानें ह्या आपल्या प्रवाशास कन्येच्या महालीं पोंचविलें. हातिमास पाहतांच राजकन्यचें मन त्यावर बसून ती दासीस ह्मणाली, पुरुष असावा तर असाच असावा, पण काय ह्यानें प्रश्नांची उत्तरें न दिलीं तर व्यर्थ सारें. मी पण केला ह्याबद्दल आतां मला

वाईट वाटूं लागलें! इतक्यांत अवसर पाहून हातीमवीर ह्मणाला–तुमच्या शहरांत येणाऱ्या प्रवाशास तुह्मी मारतां व ह्यामुळें ह्याला बेदादाबाद नांव पडलें; ह्यांतील उद्देश काय बरें? दासी ह्मणाली तेथें आमचा कांहीं उपाय नाहीं. नित्य रात्रीचे वेळीं राजकन्येच्या अंगांत भूत येतें. त्यावेळीं ती इतकी कांहीं भयंकर दिसते कीं, जिवाचे भीतीनें आह्मी कोणी तिचे जवळ नसतों. हातिम ह्मणाला बरें तर, आतां आज पाहूंच काय तें. दासी ह्मणाली, तुझें आयुष्य बळकट असो. इतकें बोलून तिनें पक्वान्नांनीं भरलेलें ताट त्याचे पुढें ठेवलें. हातिमानें ह्मटलें कीं, प्रश्नांचा निकाल केल्याशिवाय आतां कांहीं खाणें नाहीं. जेवण्यांत गुंतला तो काय काम करणार? दासी ह्मणाली, ईश्वर तुह्मांस आतां चांगली बुद्धि देवो येवढें मी इछितें. असो.

मग रात्रौ हातिम व राजकन्या एका मंदिरांत बसतीं झालीं. मध्यरात्रीच्या सुमारास राजकन्येच्या अंगांत संचार झाला. व ती ओरडून गर्जून ह्मणाली– रे तूं कोण, कां येथें आलास? माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दे. हातिम न घाबरतां ह्मणाला बोल तुझे प्रश्न. ती ह्मणाली. 'समुद्राचे ठायीं असा कोणचा गुण आहे कीं त्यापासून प्राण्यांची उत्पत्ती होते'. हातिम ह्मणाला मनुष्याचे ठायीं जो गुण तोच समुद्राचे ठायीं आहे. ती ह्मणाली बरें आलें लक्षांत. दुसरा प्रश्न हा कीं, 'सर्व फळांत उत्तम फळ कोणतें' तो ह्मणाला 'पुत्रफळ' ती ह्मणाली बरोबर आहे. तिसरा प्रश्न 'जें कोणीही इच्छित नसतां तें त्यास मिळतें' असें काय? हातिम ह्मणाला 'मरण' अशीं यथायोग्य उत्तरें ऐकून ती अंमळ शांत बसली, व लागलीच घुमायला लागून पलंगावरून कोसळली. तोंच एक भयंकर तांबडालाल सर्प तिचे नाकांतून बाहेर पडून हातिमाचे अंगावर झांप टाकूं लागला. हातिमानें त्याचेवर कट्यार उपसली. इतक्यांत

त्याचे मनांत कांहीं कल्पना येऊन त्यानें तो बहुगुणसंपन्न अस्वल कन्येचा मणि त्या सर्पास दाखवून त्याला हतवीर्य केलें. आणि मग त्यास तेथच्या एका भांड्यांत घालून बाहेरच्या आंगण्यांत पुरून ठेऊन स्वारी जागचे जागीं येऊन बसली.

नंतर थोड्या वेळानें राजकन्या सावध होऊन हातिमास ह्मणाली रे परपुरुषा, तूं येथें आलास कसा? तें ऐकून विस्मित होत्साता हातिम ह्मणाला, वाहवा! हें काय? तुझ्या बापानें ज्या प्रवाशास काल येथें आणलें तोच मी. तेव्हां तिनें दासीस हांक मारून हा पुरुष येथें कसा आला व जिवंत कसा राहिला ह्मणून ह्मटलें. हातिम तेथें कसा आला तें दासीनें सांगून ह्मटलें आतां तो वांचला ही केवळ परमेश्वरी कृपा. शिवाय नित्यापेक्षां आपली वृत्तीही कांहीं वेगळीच दिसते. त्या बद्दल आतां उजाडल्यावर विचार करूं. आतां रात्र बरीच आहे तर विश्रांतिसुख घेऊं. याप्रमाणें बोलून तीं त्रिवर्ग शयन करतीं झालीं.

उजाडल्याबरोबर राजा तेथें हातिमास जिवंत पाहून परम हर्ष मानून ह्मणाला—रे मुशाफरा, येथें येऊन जिवंत राहिलास असा एक आज तूंच. तरी ही गोष्ट कशी झाली तें सांग? हातीमानें सर्व वर्तमान सांगितलें. मग राजा ह्मणाला, तर आतां ह्या कन्येशीं आपण विवाह केला पाहिजे. हातिमानें पुष्कळ आढेवेढे घेऊन [illegible]ीं रुकार दिला. नंतर चाली प्रमाणें विवाह होऊन तीन महिने झाल्यावर हातिम तेथून निघाला. निघतेवेळीं राजकन्या गरोदर असल्यामुळें हातिमानें राजास सांगितलें कीं, हिला पुत्र होऊन तो उत्तम निपजला तर इमन देशांत आणून पोंचवावा आणि कन्या झाल्यास तिचें तुह्मींच लग्न करून टाकावें. प्रारब्धानें वांचलों तर भेटेन. कांकीं, मी आतां भयंकर कामावर जात आहें. राजानें तें ऐकून एक दोन

दिवस त्यास ठेऊन घेऊन मोठ्या दुःखानें त्यास परवानगी दिली.

नंतर हातिम तेथून निघून चिनदेशांत जेथें युसफाचे नातु राहत होते तेथें गेला; व त्यांस कच्ची हकीगत कळविली. तेव्हां युसफास मरून ह्यावेळीं १००वर्षे झालीं होतीं. त्यामुळें त्याचें बोलण्याचें मोठें आश्चर्य वाटूं लागलें. परंतु चीन देशांत सागाचे वखारी नजिक युसफाचें घर आहे, ही खूण हातिमास ठाउक आहे असें सांगितल्या वरून नातवांनीं तर त्याचें बोलणें मान्य केलें, आणि ह्याबद्दल राजाची परवानगी घेण्यास ते राजाकडे गेले. तेथें तर हातिम हा शुद्धवेडा आहे असें ठरलें. कांकीं, ज्यास मरून शंभर वर्षे झालीं तो आज कोणास भेटेल काय? शेवटीं युसफाची आपली गांठ कशारीतीनें पडली वगैरे गोष्ट सांगून ह्याला प्रमाण त्याच्या घरांतील द्रव्य तें शोधावें असें ठरलें. मग सर्वच घरीं जाऊन युसफाचे खोलींतील तें अगणित द्रव्य काढिते झाले. नंतर एक वांटा नातवांस व तीन वांटे धर्मार्थ खर्च करून हातिम तेथून निघून अदालताबादेस आपले सासऱ्याचे घरीं येऊन पोंचला. नंतर थोड्याच दिवसांत त्याची बायको प्रसुत होऊन मुलगा झाला, व त्याचें नांव सालीम असें ठेवलें. नंतर तो तेथून निघून युसफ ज्या टेंकडी जवळ भेटला तेथें गेला. तेथें गुरुवारीं रात्रीं त्याची व युसफची गांठ पडली. त्यावेळीं युसफ इतरां प्रमाणेंच आनंदांत पाहून हातिमास संतोष झाला. आपली वाईट स्थिति घालवून योग्य स्थिति आपणास दिल्याबद्दल युसफानें त्याचे फारफार उपकार मानिले. युसफानें त्या रात्रीं हातिमास जेऊं घातलें. नंतर हातिम उजाडल्यावर आपल्या मार्गास लागला.

पुढें जातांना एक भिक्षामागत असलेली म्हातारी त्यास भेटली. तिच्या हातावर तो एक हिऱ्याची आंगठी टाकून चालता झाला. पण ती हातिमास वाटली तशी नवती. ती वाटमाऱ्यांची

आई असून मोठी कौटाळीणही होती. हातिम हांकेच्या पली कडे जातांच कांहीं चेटुक करून 'अरे परमेश्वरा माझ्या साहायास कोणी पाठीव' अशी तिनें आरोळी मारली. तों सात जवान तिचे पुढें येऊन पोंचले. ते तिचे पुत्रच होते. तिनें त्यांस ती आंगठी दाखवून ह्मटलें कीं, ही ज्यानें दिली तो नुकताच पुढें गेला आहे त्याचे जवळ बहूत द्रव्य आहे तर येवढी शिकार साधलीच पाहिजे. तें एकतांच चित्या सारख्या उड्या मारीत जाऊन त्यांनी हातिमास गांठलें. नंतर नीट लाग साधतां यावा ह्मणून 'आह्मी गरीब आहोंत, कांहीं तरी उद्योगधंद्यास लावाल तर उपकार होतील' वगैरे बोलून चालून संधान पाहून एकानें त्यावर जाळें टाकलें. लागलेंच दोघांनीं त्यास उचलून एका खोल खाड्यांत टाकून तरवारीनीं त्यास बऱ्याच जखमा करून त्याचे अंगावरील होतें नव्हतें तेवढें लुबाडून घेऊन ते हर्षायमान होत्साते निघून गेले. घाव लागल्यामुळें हातिमास मूर्छना येऊन तो पडला. पुढें चौथे दिवशीं अंमळ सावध होऊन त्यानें अस्वल कन्येनें दिलेलें मोतीं त्याचे जवळ राहिलें होतें तें जखमांवर लावतांच त्या पूर्ववत होऊन तो हुशार झाला. परंतु खाडा फारच खोल असल्यामुळें त्याला आंतून निघतां येईना. त्याला चोरांबद्दल बराच राग आला, त्यांस बहुत द्रव्य देऊन ह्या वाईट कर्मांविषयीं त्यांना उपदेश करावा असें ही त्याचे मनांत वाटलें. परंतु निरुपायामुळें तो तेथेंच ग्लानी येयेऊन पडला. इतक्यांत एका अवलियानें त्याचे स्वप्नांत सांगितलें कीं, तूं चिंता करूं नको. ह्या खाड्यांत तुला अपरिमित द्रव्य सांपडेल, व दोन मनुष्यें येथें येऊन ते तुला बाहेर काढतील. नंतर तो अदृश्य होतांच स्वप्नाप्रमाणें दोन पुरुष तेथें येऊन त्यांनीं हातिमास बाहेर काढलें. हातिमानें त्याचे कडून खाड्यांतील तें अपार द्रव्यही काढून वर घेतलें. नंतर हें द्रव्य चो-

रांस द्यावें असा त्याचा हेतु उत्पन्न होऊन तो माघारीं गेला. तों ती थेर्डी वाटेवरच त्याला भेटली. तिचे हातावर एक हिरा टाकून तो पुढें चालला. तोंच तिनें आपले सात जवान हातिमाचे मागोमाग दवडले. त्यावेळीं हातिमानें त्यांस बहुत बोध करून व इथःपर वाटमाऱ्याचें काम करावयाचें नाहीं अशी शपथ घेऊन आहे तें द्रव्य त्यांस अर्पण करून तो मार्गस्थ झाला.

तो पुढें चालला तों एक भुकेला कुत्रा त्याला भेटला. हातिम हा परवत्सलच. त्याला दया येऊन त्यानें कुत्र्याला जवळ घेतलें. त्यावेळीं अन्नपाण्यावांचून हा कुत्रा बेजार आहे असें जाणून कांहीं नसल्यामुळें त्यानें दूर एका खेड्यांतून भीक मागून कांहीं अन्न आणून त्यास खाऊं घातलें. तेणेंकरून तो कुत्रा हुशार होऊन हातिमाचे भोंवतीं उड्या मारूं लागला. इतक्यांत हातिमानें त्याचे डोक्यावरून हात फिरवीला तों तेथें एक खिळा ठोकला आहे असें पाहून त्यानें तो उपटतांच कुत्र्याचें रूप नाहींसें होऊन सुंदर तरूण पुरुष बनला. तें पाहतांच हातिमानें त्याचें वर्तमान विचारलें. तो ह्मणाला, मी एका व्यापाऱ्याचा मुलगा आहें. माझा बाप चीनदेशाशीं व्यापार करीत असे. एक वेळ तो खेटानामक गांवीं चीनचा कांहीं माल घेऊन गेला असतां त्याला अतोनात द्रव्य मिळालें. नंतर त्यानें माझें मोठ्या थाटानें लग्न केलें.कांहींका दिवसांनीं तो मरण पावल्यावर मी बरीच दौलत ख्यालीखुशालींत उडविली. त्याबद्दल मला पश्चात्ताप होऊन मी ही बापाप्रमाणें चीनदेशांत व्यापारास गेलों. इकडे माझी बायको घरांतील एका सिद्धी चाकरावर फिदा होऊन गेली. तो सिद्धी मोठा चेटक्या असावा. कांकीं, मी घरीं आल्यावर एक वेळ निद्रिस्त झालों असतां आपण जो उपटून काढला तो खिळा त्यानें बायकोकडून माझे डोक्यांत ठोकविला. तेणेंकरून मला हें श्वानरूप प्राप्त झालें. त्यावेळीं बायकोनें लाथ मारून मला घराब

डेर घातलें, ह्यास बरेच दिवस झाले. आज आपण माझी ह्यांतून सुटका केल्यामुळें मी आपला फारफार ऋणी आहें. मग हातिमानें त्यास त्याचा गांव विचारला. तो ह्मणाला, येथून तीन दिवसाचे वाटेवर सुरीनामक गांव आहे तेथचा मी रहाणारा. हातिम ह्मणाला, चल तर मग मलाही तेथेंच जायचें. त्याच गांवीं हारित नामक व्यापारी राहतो. त्याचे कन्येच्या प्रश्नाचें उत्तर सांगायला जाणें आहे, तर चल. आणि हा खिळा जतन करून त्या तुझ्या दुष्ट बायकोच्या डोक्यांत ठोक. इतकें बोलून ते मार्गस्थ झाले. तिसरे दिवशीं गांवीं गेल्यावर तो तरुण गुपचुप घरांत शिरला. त्याला पाहतांच त्याचे चाकरांनीं ओळखून आनंदप्रदर्शित केला. परंतु त्यानें त्यांस गुपचुप करून सिद्धयाचा तपास काढून त्यास ठार केलें, व बायकोच्या डोक्यांत तो खिळा ठोकून तिची कुत्री बनविली. नंतर आपल्या मित्रास तो प्रकार दाखविला. हयशाचा वाईट परिणाम पाहून हातिमास दया आलीच पण ती व्यर्थ होती. नंतर हातीमानें आपले मित्राची गांठ घेऊन नंतर हारित कन्येची गांठ घेतली व कच्चा मजकूर तिला कळविला. गुरुवारचे रात्रीं शब्द होत होते ते बंद झाल्यामुळें हातिम विजयी झाला असें हारित कन्येस वाटून ती त्याची वाट पाहत होती. त्यामुळें हातीमाचे भेटीनें तिला परम संतोष होऊन तिसरें कार्य जें 'महापरीजवळील शहामोरा हिरा आणावयाचें' तें तिनें हातिमास सांगितलें. तें ऐकून तो आपला मित्र जो 'नाईम नामक' त्याचे मनास धीर देऊन मार्गस्थ झाला.

नंतर हें कार्य राक्षसाचे साहाय्यावांचून व्हावयाचें नाहीं अशा कल्पनेनें तो त्याच नगरांत असलेल्या गुहेंतून तहत राक्षसांचा राजा जो फारोकशहा त्याचे राज्यांत गेला. नंतर आगतस्वागत झाल्यावर राजानें येण्याचें कारण विचारल्यावरून 'शहामोरा' नामक हिरा आणण्यासाठीं जात आहें असें हातिमानें त्यास

सांगितलें. ही गोष्ट मोठी भयंकर जाणून राजानें त्यास कांहींच उत्तर दिलें नाहीं. पण मग तो आपला हेका सोडीत नाहीं असें पाहून त्यास विमानांत बसवून कांहीं राक्षसांकडून काफ नांवाचा पर्वत जो गंधर्वराज्याची शेवटली हद्द तेथपर्यंत नेऊन सोडलें, तरी हातिमास एक महिना येथपर्यंत येण्यास लागला.

नंतर ते राक्षस तेथेंच राहून हातीम पुढें चालला. तो जोंजों पुढें जाई तोंतों तो पर्वत त्याला उंचउंच दिसूं लागे. तो चमत्कार पाहत तो पर्वताचे पायथ्याशीं गेला. इतक्यांत तेथील सरहद्दीच्या रखवालदार गंधर्वांनीं त्यास पकडून पर्वतावर नेऊन तूं कोठून आलास ह्मणून त्यास विचारलें. त्यानें 'सुरी शहराहून' येवढें ह्मणतांच राक्षस ह्मणाले, हं हं हारिथ कन्येकडून आपण आलां वाटतें. तें ऐकतांच तो चूप बसला. तेव्हां 'शहामोरा' उपटण्या साठीं ही स्वारी आली असें समजून गंधर्वांनीं प्रचंड अग्नि पेट-वून त्यांत त्याला टाकलें. हातिमानें हा प्रसंग पाहून मुकाट्यानें आस्वल कन्येचें मोतीं तोंडांत ठेविलें. तेणेंकरून त्यास अग्नीची बिलकूल बाधा न होतां तिसरे दिवशीं तो अग्नींतून निघून चालता झाला. तों पुन्हा त्याच गंधर्वांनीं पुन्हां त्याला गांठलें; व पूर्ववतच प्रकार होऊन पुन्हां हातिम पुढें चालला. पुन्हां तिस-ऱ्यानें असाच प्रकार घडून चौथ्यानें त्या गंधर्वांनीं त्याला समु-द्रांत फेंकलें. तेव्हां एका माशानें त्यास गिळलें. मोत्याचे योगानें त्याला येथेंही कांहीं इजा न होतां त्या प्रचंड माशाच्या पोटां-तून तो खुशाल हिंडूं लागला. तेणेंकरून त्या माशास बहुत त्रास होऊन त्यानें किनाऱ्यास येऊन त्याला ओकून काढलें. तेणेंकरून हातिमास आनंद होऊन तो दोन दिवस तसाच अन्नपाण्यावांचून होता. नंतर दुसऱ्याच एका गंधर्व टोळीनें त्यास गांठून त्याची पुसतपास केली. हातिम ह्मणाला, परमेश्वराचे इच्छेनें मी येथें आलों, वगैरे बोलून काफपर्वतापासूनचें सर्व वर्तमान सांगून कांहीं

खावयास मागितलें. परंतु मनुष्यप्राण्यास येथें पाण्याचा थेंबही द्यावयाचा नाहीं असा तेथील राजाचा कायदा असल्यामुळें हातिमाच्या मागणीची तेथें पुष्कळ भवतिनभवति होऊन एवढ्या संकटांतून ईश्वरानें जर ह्याला वांचविलें तर आपणही ह्यावर दया करावी असा विचार होऊन त्यांनीं त्याला घरीं नेऊन त्याची चांगलीच बरदास्त ठेवली. तेणेंकरून हातिमास संतोष वाटून तो अशा कांहीं रीतीनें त्यांच्याशीं वागला कीं, शेवटीं भावापेक्षांही त्यांची हातिमावर प्रीति बसून तो नेहमीं जवळ असावा असें सर्वांस वाटूं लागलें.

ह्यानंतर एके वेळीं ते सर्व आनंदांत असतां गंधर्वांनीं हातिमास आपल्या प्रवासाचें कारण विचारलें. तेव्हां हातिमानें त्यास खरीखरी हकीगत सांगितली. मग शहामोराच्या प्राप्त्यर्थ हातिम येथें आला हें ऐकून त्यांना मोठा दचकाच भरला. ते ह्मणाले, तो हिरा कोणालाच प्राप्त होणार नाहीं. हातिम ह्मणाला ह्याला अशी एक युक्ति करा कीं, मी तुमच्या राज्यांत आलों हाच गुन्हा ठरवून माझे हातपाय बांधून मला राजदरबारीं न्या. ते ह्मणाले, जर तूं आमचा मित्र तर अशा रीतीनें आमच्याच्यानें तुला नेववणार नाहीं. तेव्हां एकजण ह्मणाला, असें कशाला ? समुद्र किनारीं आह्मांस एक फारच सुंदर मनुष्य सांपडला आहे त्याची कशी व्यवस्था करावयाची इतकें राणीला कळवावें, मग ती काय सांगेल त्यावर पुढचा विचार. हें सर्वांस पसंत पडून त्यांनीं तत्काळ महापरीचे दरबारीं ही वर्दी दिली. तें ऐकून 'त्यास नीट संभाळून दरबारीं घेऊन या' अशी महापरीनें त्यांस आज्ञा केली.

गंधर्वराज्यांत कोणी फारच रूपसंपन्न पुरुष आला आहे ही बातमी तेथील बऱ्याच लोकांस कळली. त्यावेळीं महापरीची दासी म्हसनापरी व तिची कन्या हसनापरी हिचे कानीं हें

वर्तमान येऊन त्या पुरुषास पाहण्यास ती अगदींच उतावळी होऊन गेली. तशांतून घरांतून बाहेर पडण्याची मुश्कील असल्यामुळें तिला फारच वाईट वाटून गेलें. तेव्हां तिच्या दासींनीं 'बागेंतील बंगल्यांत हवा खावयास जाण्याबद्दल तिच्या आई पासून परवानगी घेतली. व मग ज्या रस्त्यानें हातिम जाणार त्याच रस्त्यानें समुद्रकिनारीं ती एके स्थळीं राहिली. हातिम तिच्या दृष्टि केव्हां पडेल ह्याविषयीं ती फारच आतुर होऊन गेली, व तिनें एक सारख्या दासी त्याच्या पाळतीवर ठेवल्या. नंतर कर्मधर्म संयोगानें पाहरेकरी हातिमास घेऊन जात असतां त्याच रानांत त्यांना सूर्य मावळल्यामुळें तेथेंच त्यांनीं मुक्काम केला. व वाटेच्या श्रमानें त्या सर्वांनाच झोंपही गाढ लागून गेली. अशी उत्तम संधी प्राप्त होतांच हसनापरीनें दासींसह तेथें जाऊन सर्वांवर मोहन अस्त्राचा प्रयोग करून तिचा मनमोहन जो हातीम तो तिनें उचलून नेला. नंतर थोड्याच वेळानें हातिम जागा होऊन आपण सुंदरशा स्थळीं आहों असें पाहून अत्यंत विस्मित होऊन गेला.

इतक्यांत तो तेथें कसा आला ह्याची साग्र हकीगत हसनापरीनें मोठ्या नम्रतेनें त्याला कळविली. हातिमाला असें कांहीं पाहिजेच होतें. मग तो ह्मणाला, 'शहामोरा हिरा' जो तुझ्या राणी जवळ आहे तो मला देशील तर मी तुझी इच्छा पूर्ण करीन. तेव्हां हसनापरी विलक्षण मुद्रा करून ह्मणाली, छीः कालत्रयीं तो हिरा कोणास प्राप्त होणें नाहीं. ह्मणून सांगतें कीं, हा नाद सोडूनच द्यावा. आतां इतकें कीं, मनुष्य प्राणी अकलेनें देव, राक्षस, यक्ष गंधर्व गुह्यक इत्यादि सर्वांत श्रेष्ठ आहे. तर आपल्या कल्पना शक्तीनें आपण तो मिळवाल तर माझी आपणास सर्वोत्कृष्ट मदत आहे. इत्यादिप्रकारें बोलून तिनें हातिमास आपलेसें करून घेतलें.

राणीची परवानगी घेऊन तेथून हसनापरीचे महालीं गेला. तेथें चार महिने आनंदांत काळ घालवून त्या प्रचंड द्रव्यासह तो राक्षसराज्यांत गेला. तेथेंही दोन दिवस राहून विवर मार्गानें सुरी शहरीं गेला. नंतर तात्काळ नाइमाची गांठ घेऊन हारिथ-कन्येकडे गेला, व ज्या हिऱ्याची आंगठी बोटांत घातली अ-सतां भूमिगत द्रव्य त्यास दिसत होतें तो अद्भुत हिरा तिचेपुढें ठेवला. ह्याप्रमाणें त्यानें तिच्या तिन्ही प्रश्नांचा उलगडा क-रून कराराप्रमाणें आपल्या मित्राचें तिच्याशीं लग्न लावून त्याला संतोषित केलें. नंतर त्याच्या आग्रहास्तव तो कांहीं दिवस तेथें राहिला. आतां निघणार तोंच एकाएकीं हिरा नाहींसा झा-ल्यामुळें हारिथ कन्येनें फारच शोक मांडला. तेव्हां हातिमानें तिचें बहुत प्रकारें समाधान करून स्वारी आपल्या पूर्व कार्या-साठीं निघून गेली.

पुढें तो कांहीं दिवस मार्ग क्रमण करीत असतां एके ठिकाणीं एक भव्य इमारत त्याचे दृष्टीस पडली. तिकडे पाहत असतां दरवाज्यावर ‘ चांगलें करा आणि पाण्यावर टाका ’ अशीं आ-पलीं इष्ट अक्षरें पाहून त्यास फार समाधान झालें; व तो त्याकडेच पाहत उभा राहिला. तोंच आंतून एक दोन चाकर बाहेर येऊन त्यांनीं त्यास आंत नेऊन वाड्याच्या मालकापुढें उभें केलें. तेव्हां तो धनी एका विशाल व मनोहर जागेंत सुं-दरशा बैठकीवर बसला होता. त्यानें मोठ्या आदरानें हातीमास आपले जवळ बसविलें. मग तात्कालिक थोडें भाषण होऊन भोजनोत्तर ते एकत्र बसले असतां हातिमानें दरवाज्यावरील वाक्याचा हेतु त्यास विचारला. तेव्हां तो थोर पुरुष ह्मणाला, बाबारे मी तरुणवयांत दरोडे घालणें, वाटमाऱ्यांचीं कामें करणें, वगैरे वाईट कामें बहुत करीत होतों. तरी माझा असा नियम असे कीं, असें कांहीं वाईट काम केलें ह्मणजे घरांत येतांच स्नान

करावें. स्वयंपाक स्वतां माझा मीच करावा. नंतर शिजलेल्या अन्नापैकीं कांहीं भाग पाण्यांत टाकून भोजन करावें. असा माझा क्रम बहुत वर्षें चालला. पुढें एकाएकीं मला मृत्यूनें गांठून यमलोकीं नेलें, व आतां मला भयंकर नर्ककुंडांत टाकणार तोंच यमराजाची दिव्य मूर्ति तेथें येऊन ती त्या यमदूतांस ह्मणाली, अरे तुह्मी चुकलां; ह्याला तर अजून शंभर वर्षें आयुष्य आहे. तर ह्याला परत करून ह्याचे नांवाचाच जो दुसरा गृहस्थ त्याला आणा. तें ऐकून त्यांनीं मला माघारें आणलें. हें माझ्या अन्नदानाचेंच फल होय. असो. पण मग मला त्या दिवसापासून पश्चात्ताप झाला. माझा वाईट धंदा मोडला. शिवाय नियमाप्रमाणें मी अन्न पाण्यांत टाकीत असतां मला एक तेथें मोहरांनीं भरलेली थैली सांपडली. ती घेऊन ही कोणी तरी विसरला तेव्हां ती ज्याची त्यास मिळावी ह्मणून मी ती जपून ठेवली. पुढें अशा रीतीनें नित्य अन्न टाकण्याचे वेळीं मला एकेक थैली सांपडूं लागली, व मागणेकरी तर कोणी येईना, तेणेंकरून मला मोठा विस्मय वाटून गेला. त्याच रात्रीं मला एका महंतानें स्वप्नांत असें सांगितलें कीं, अन्नदानानें परमेश्वर संतुष्ट होऊन त्यानेंच हें द्रव्य तुला दिलें आहे. तर आतां तुझ्या नित्य खर्चापुरतें ह्यांतून द्रव्य ठेऊन बाकीचें धर्मकर्मी खर्चावेंस, तुला नित्य अशीच थैली मिळत जाईल. महाराज, ह्या स्वप्नाचे योगानें ईश्वरकृपेबद्दल मला आश्चर्य वाटून मी आपला तसाच क्रम ठेवला. व त्याच दिवशीं तुह्मी वाचलें तें वाक्य दरवाज्यावर लिहून ठेवलें. हें ऐकून हातिमास ही ईश्वरलीलेचें बहुत आश्चर्य वाटलें. असो. मग एक अर्धा दिवस तेथें राहून तो शहाबादेच्या रस्त्याला लागला.

परत येतांना वाटेंत एक काळा व एक पिवळा असे दोन सर्प एकमेकांशीं मोठ्या निकरानें भांडत असून पिवळा अगदीं

तिपाईस आला आहे, तेव्हां त्यास सोडवावें असें वाटून हातिम त्याचे अंगावर धांवला. तोंच तो काळा साप पळाला. मग हातिमानें पिवळ्या सर्पास अमळसें गोंजारलें. तोंच त्याचा एक सुंदर मनुष्य बनून बोलूं लागला, महाराज आपण मला आज जीवदान दिलें. मी एका गंधर्व राजाचा पुत्र आहें, व तो काळा साप माझ्या बापाचा चाकर आहे. तो माझा भारी द्वेष करतो. आज तर त्यानें जादूचे योगानें मला व आपणासही सर्प बनवून भयंकर प्रसंग आला होता, पण तो आपले योगानें टळला. इतकें बोलून त्यानें आग्रह करून आपले घरीं नेऊन दोन दिवस ठेऊन सन्मानानें हातिमाची रवानगी केली. तेथून मात्र हातिमास कांहीं अडथळा न होतां तो शहाबादेस जाऊन मित्रासह बानूकडे गेला व तिच्या प्रश्नाचें उत्तर सांगून तिला आनंदविता झाला. नंतर दोन चार दिवस राहून तिच्या तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर आणण्यासाठीं निघून गेला.

---

# सवाल तिसरा.



## कोणाशीं दगा करूं नको, करशील तर तसें फळ पावशील

ह्या प्रश्नाचा उलगडा करण्यासाठीं शहाबादेहून हातिम निघाला तो उत्तर दिशेचा मार्ग लक्षून जात असतां ज्याचीं शिखरें जणू गगनमंडळाचा भेदच करीत आहेत असा एक पर्वत त्याला दिसला. नंतर तो वलांडून जाण्याच्या इराद्यानें तो चालला असतां तेथें नजिकच ' हे मच्चित्तहारके लौकर ये, तुझ्यावांचून हा प्रदेश मला स्मशानवत वाटतो. ' असें ह्मणत असलेला एक मनुष्य वृक्ष छायेंत संगमरवरी दगडाच्या चौथऱ्यावर उभा आहे असें पाहून हातिम त्याचेजवळ जाऊन ह्मणाला रे

असा एक मनुष्य त्याचे दृष्टीस पडला.तेव्हां हातिमानें त्याचें दुःखाचें कारण विचारलें. तो ह्मणाला मी कांहीं धंदा उद्योगासाठीं हिंडत असतां एका जादूगाराचे गांवीं गेलों. असें मला कळतांच तेथून तसाच मार्गे फिरून हिंडतां हिंडतां एका कोशावर मला एक सुंदर बगीच्या आढळला. तेथें जाऊन शोभा पाहत असतां तेथें कांहीं तरुण स्त्रिया मला आढळून परक्यानें येथें येण्यास हें स्थळ अयोग्य असें समजून मी तेथून बाहेर पडलों. तोंच तेथील मालकीणीनें एका दासीकडून मला बोलावून आंत नेलें. त्या वेळीं तिचें तें मोहक रूप पाहून मी उभा होतों तो तसा भिंतीवरच टेंकलों. इतक्यांत दुसऱ्या एका दासीनें मला एका दिवाणखान्यांत नेलें. नंतर थोड्याच वेळानें ती मालकीणही तेथें येऊन आह्मी उभयतां गोष्टी बोलत बसलों. इतक्यांत तिचा बाप तेथें आला. तोच तो त्या गांवांतील जादूगार. मला पाहतांच त्याला भयंकर क्रोध येऊन त्यानें आधीं कन्येचीच मान धरली. तेव्हां ती दीन वदनानें ह्मणाली, बाबा माझा कांहींचा अन्याय नाहीं. आधीं कायतें ऐका, आणि मग जें करणें तें करा.तेणेंकरून तो अंमळ शांत होऊन बसला. तों इतक्यांत एक वृद्ध दासी पुढें होऊन ह्मणाली, बाबासाहेब हीं दोघेंही निरपराधी आहेत. हा गृहस्थ एक प्रवासी असून नुकताच येथें आला. तो थोर पुरुष आहे, आणि आपली कन्याही उपवर आहे. हा अनायासें योग आला, तर उभयतांचें लग्न करावें असें मी ह्मटलें. मग त्यानें पोरीची संमती घेऊन रुकार तर दिलाच. पण मला ह्मणाला, रे गृहस्था जर तुला माझी कन्या पाहिजे तर माझ्या तीन अटी तूं पूर्ण कर. तें कबूल करतांच त्यानें चार लोक जमवून मला सांगितल्या. पहिली अट 'परो नामक पक्षाचा एक जोडा आणणें, दुसरी. 'लाल रंगाचा एक सर्प असून त्याचे तोंडांत हिरा आहे तो

आणणें ' आणि तिसरी अट ही कीं, तूं स्वतः तापलेल्या तेलाच्या कढयींतून जीवंत बाहेर येणें. ह्या तीन अटी पूर्ण केल्या ह्मणजे माझी कन्या मी देईन. हें त्याचें भाषण ऐकून त्यास रुकार देऊन तेथून तर निघालोंच, व उगीच्या उगीच खूप लांबवर प्रवास केला. पुढें अन्नपाण्याच्या टंचाईमुळें अगदींच कमकुवत होऊन येथेंच शोकाक्रांत होऊन पडलों. आतां जरी चालण्याचे श्रम नाहींत तरी ' कोण व असा शोकाक्रांत कां ' ह्याचीं उत्तरें देतां देतां थकून गेलों. विचारणारे रगड पण मग पुढें काय ! सारांश दुःखांतून मुक्त करणारा कोणी नाहीं. प्रारब्ध माझें ! तें ऐकून हातिम ह्मणाला चिंता नाहीं. मी तुझें कार्य करतों. तूं येथेंच अस. असें बोलून त्यास हुषारी देऊन त्याचे कार्यास चालता झाला. जातां जातां मनांत योजलें कीं, मागें माझानद्रानामक अरण्यांतून कोल्ह्यानें परीपक्षाचा मेंदु आणला होता. तेथें गेलों असतां त्या पक्षाचा जोडा मिळेल. असा विचार करून जातां जातां एका नगरासमीप गेला. त्यावेळीं गांवांतील सारे लोक एकत्र जमून तटाभोंवतीं लांकडांचा मोठा ढीग रचीत होते. तें पाहून ' हें काय करतां ' असें त्यानें त्या लोकांस विचारिलें. ते ह्मणाले, एक महा भयंकर राक्षस नित्य रात्रीं शहरांत शिरून सांपडतील तेवढीं माणसें मारतो. ह्यासाठीं हा लांकडाचा ढीग रात्री आह्मी पेटवितों. ह्मणजे ह्या ज्वाळांस पाहून राक्षस भिऊन जातो. सबब हा उद्योग चालू आहे. हातिम ह्मणाला, तो राक्षस कसा आहे बरें ? लोक ह्मणाले, प्रचंड पर्वतासारखा त्याचा आकार असून त्यास सात तोंडें आहेत. पैकीं एक हत्ती सारखें असून त्याला तीन सोंडा आहेत, व सोंडेच्या दोन्ही बाजूस तीन तीन तोंडें सिंहमुखासारखीं आहेत. मग थोडावेळ विचार करून हातिम ह्मणाला, भिऊं नका, जर राक्षस येण्याच्या मार्गावर एक

प्रचंड खाडा खणून त्याचे भोंवतीं कांहीं लांकडांचे व कांहीं कांस्यांच्या फांद्याचे ढीग करून द्याल तर मी तो राक्षस ठार करीन. तें त्या लोकांनीं मान्य करून तत्काळ तयारी करून दिली. मग हातिम धनुष्य सज्ज करून त्या खाड्यांत बसला. व लांकडांचे ढिगास आग लावून दिली. नंतर प्रहर रात्री नंतर तो राक्षस भयंकर गर्जना करीत तेथें आला. परंतु आग प्रचंड पेटली असल्यामुळें तो वेड्या सारखाच इकडे तिकडे हिंडूं लागला. तोंच हातिमानें संधान धरून बाण सोडून हत्ती मुखावरील एक डोळा फोडून टाकला. तेणें करून राक्षस फारच घाबरून जो गेला तो पुन्हां आला नाहीं. असो. हातिम त्यास पिटाळून लावून सकाळीं लोकांस खबर देता झाला. नंतर एक दोन दिवस तेथें राहून तो राक्षस येत नाहीं अशी त्या लोकांचीं त्यानें खात्रीही करून दिली. हातिमानें हे जे उपकार केले ह्यासाठीं लोकांनीं कृतज्ञ होऊन मोठ्या सन्मानानें त्यास आपल्या राजाकडे नेऊन कच्चा मजकूर राजास कळविला. तें ऐकून राजानेंही त्याचा बहुत सन्मान करून जातेवेळीं आपण व आपली प्रजा ह्यांच्या कडून त्यास पुष्कळ देणगी दिली. हातिमास त्याची आवश्यकता नव्हतीच तरी त्यांच्या आग्रहास्तव त्यानें दीन अनाथांस सारें द्रव्य देऊन आपला रस्ता पकडला.

नंतर एके दिवशीं मार्ग क्रमीत असतां एक काळा साप व एक मुंगूस ह्याची झुंज लागून दोघेही निकरावर आले आहेत असें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें. दोघेही बलानें सारखे असल्यामुळें कोणीच कोणास हटेना. तें पाहून हातिमानें त्यांना बरेंच निषेधिलें. तेव्हां सर्प ह्मणाला, ह्या मुंगसानें माझा बाप मारला सबब मी ह्याशीं भांडतों. मुंगस ह्मणाला ह्याचे बहिणीवर माझें मन बसलें आहे, ह्याचा बाप ती मला देईना सबब

मी त्याला मारलें, व आतां हा केवळ माझा भक्ष ह्मणून मी ह्याला मारून खाणार. हातिम ह्मणाला तुला क्षुधा शांत करणें आहे तर ह्याला सोडून मला खा. मी आपला देह तुला देतों. मुंगस ह्मणाला असें असेल तर ठीक आहे. आतां येवढेंच कर कीं, तुझ्या गालाचा थोडा तुकडा दे ह्मणजे मला पुरे. हातिमानें लागलीच कट्यार काढली व आतां गाल कापणार तोंच ते दोघे-ही मनुष्यरूप धरून त्यांतील मुंगसरूपी मनुष्यानें हातिमास ह्मटलें, हे उदारा धैर्यशाली पुरुषा पुरे पुरे, आमची खरी हकी-कत तुला सांगितली तीच खरी. मात्र आह्मी गंधर्व असून ह्याच्या बहिणीमुळेंच आमच्यांत वैर वाढलें आहे. हातिम ह्म-णाला तर आतां असें करा कीं, एकमेकांनीं आपापल्या बहिणी एकमेकांस देऊन इतःपर प्रेमानें वागावें. तेव्हां मुंगसरूपी गंधर्व ह्मणाला 'हें जें दिसतें आहे या नगरचा राजा माझा बाप आहे त्याचें नांव हमीर. हाही राजघराण्यांतलाच आहे. पण माझी बहिण ह्यास देणें हें माझ्या बापास आवडलें पाहिजे. हातिम ह्म-णाला मला तुझ्या बापाकडे घेऊन चल ह्मणजे मी हें सारें जुळ-वितों तें ऐकून त्या दोघांनीं हातिमास राजाकडे पोंचविलें. हमीर राजानें ह्मटलें, रे मनुष्यप्राण्या येथें येण्याचें काय बरें कारण? हातिमानें फक्त तंट्याची हकीगत सांगितली. व ठरल्याप्रमाणें लग्नें करण्याबद्दलही सांगितलें. मग हमीरानें त्यास मान्यता दे-ऊन दोघांचें दोघांच्या बहिणीशीं लग्न लाविलें. लग्ना नंतर हातिमही पुढें चालता झाला. जातेवेळीं हमीरानें त्यास एक जादूनें भरलेला सोटा देऊन ह्मटलें कीं, ही बहुगुणसंपन्न वस्तु आहे. हा उभा धरला तर कोणत्याही विषाची बाधा होत नाहीं. कोणी जादूचा प्रयोग केला तर हा अंगाभोंवती फिर-वावा ह्मणजे ती जादु चालत नाहीं. जळांतून जातांना त्याची नौका बनते. अग्नीची बाधा होत नाहीं. असा तो सोटा दे-

ऊन ज्याचे योगानें कोणच्याही रंगाच्या सर्पाची बाधा होणारी नाहीं असें एक मोतींही दिलें. हातिमासारख्या प्रवाशाला ह्या वस्तु केवळ लाखो रत्नांच्या किंमतीच्या होत. त्या हातीं पडतांच त्यास आनंद होऊन त्यानें राजाचे बहुत आभार मानून तेथून कूच केलें. थोड्याच मजलेंत त्यास एक नदी लागली ह्मणून अनायासेंच तींत सोटा टाकून त्याची नौका बनतांच तींत बसून तो चालता झाला. समुद्रासारखी ती प्रचंड नदी असून पाणी काळेंभोर होतें. तो अर्धी नदी ओलांडून गेला नसेल तोंच एका भयंकर दैत्यानें नौकेसह त्यास पाण्यांत ओढून नेलें. त्यावेळीं हातिम तर अगदीं भ्रमिष्टच झाला. पण शुद्धीवर आल्यावर पहातोंतों आपण नुसत्या जमीनीवर उभे असून नौकेसह बुडविणारा दैत्य हात जोडून त्याचेपुढें उभा आहे. तें पाहून तो जों आश्चर्य भरित होतो आहे तोंच तो दैत्य ह्मणाला महाराज, मी आपणांस येथें आणून आपला अपराधी झालों आहें. असो. पण असें करण्यांत हेतु इतकाच कीं, ही जागा माझी असून दुसऱ्या एका दैत्यानें मला हांकलून घेतली आहे. तो महा बलाढ्य आहे, तर त्याचे पासून माझी जागा मला देववावी. इतकें तो बोलत आहे तोंच त्याचा शत्रूही ओरडत गर्जत तेथें आला. त्याला पाहतांच पूर्वीचा दैत्य पळाला. हातिमास थोडी भिति वाटली. परंतु परमेश्वर स्मरणकरून सोटा हातांत घेतांच त्याची भीति गेली, व दैत्यही नम्र होऊन त्याचे पायां पडला. तेव्हां हातिम ह्मणाला, रे तूं सामर्थ्याच्या जोरावर दुसऱ्याची मत्ता कां हरण केलीस? तूं समर्थ आहेसच, मग तुला अशीं स्थळें दुसरीं बनवितां येणार नाहींत काय. हें ऐकतांच दैत्य एकदम संतापून हातिमाच्या अंगावर धांवला. मग येथें आतां दुसरा तिसरा विचार व्यर्थ जाणून हातिमानें जादूचा सोटा नसता

गेला व पळाला. त्याची अशी अवस्था पाहतांच पूर्वीचा दैत्य येऊन हातिमाचे आभार मानूं लागला. असो. नंतर त्या सो-ढ्याचे नौकेनें हातिम तेथून निघून नदी उतरून चालता झाला, नंतर थोड्याच अवकाशांत तो एका भयंकर अरण्यांत गेला, आणि रात्रीचेवेळीं एका वृक्षाखालीं राहिला. त्या वृक्षावर बहुत परोपक्षी असत. हातिमास ओळखून 'हा महापरोपकारी पुरुष आहे तर ह्याला कांहीं तरी आपण मदत करूं.' असें आप-सांत बोलून तत्काळ त्याचे भोंवतीं जमून ते आपापलेपरी त्याची सेवा करूं लागले. हा प्रकार पाहून हातिमानें परमेश्वराचे भारी अभार मानले. इतक्यांत एक पक्षी ह्मणाला, हे परार्थ आपले शरीर झिजविणाऱ्या पुरुषा, सांप्रत तूं दुसऱ्यासाठीं आमचा एक जोडा नेण्यास्तव आला आहेस असें आह्मांला कळलें आहे; आतां तूं परासाठीं कष्ट घेतोस ह्मणून तो आह्मी एक जोडा देतों. इतकें बोलून त्यांनीं आपलेपैकीं एक जोडा देऊन स-न्मानानें त्याची रवानगी केली.

इष्ट वस्तु हातीं येतांच हातिम तत्काळ परत येऊन आपले मित्रास भेटून त्यास तो जोडा देऊन माझानद्रान अरण्याची कच्ची माहिती सांगून मजविषयीं कांहीं बोलूं नको अशी ताकीद देऊन त्यानें त्यास त्या जादुगाराकडे रवाना केलें. नंतर त्या गृहस्थानें जादूगारास ती वस्तु देऊन तांबड्या सर्पाच्या तोंडां-तील हिरा कोठें मिळेल हें विचारून हातिमाकडे आला. येतांना त्यानें आपल्या प्रियसुंदरीचें दर्शनही घेतलें होतें. त्यामुळें त्याचा चेहरा खूप टवटवींत झाला होता. त्यानें येतांच हातिमास मोठ्या आनंदानें सर्व वृत्तांत कथन केला. नंतर हातिम एक दोन दिवसांनीं दुसरी अट जी लाल सर्पाचे तोंडांतील हिरा तो आणण्यासाठीं निघाला. तो हिरा काफ पर्वताकडे मिळेल असें जादूगार कन्येकडून तिच्यावर प्रेम ठेवणारास व त्याचेकडून

हातिमास कळलें असल्यामुळें हातिम त्याच मार्गानें चालला.

कांहीं मार्ग क्रमण झाल्यावर त्यास एक नवाच चमत्कार दृष्टीस पडून त्याचा शोध करण्यांत त्यानें बरेच दिवस मोडले. तो चमत्कार असा कीं, एका सर्पाचे अंगावर सात प्रकारचे रंग असून पक्षाप्रमाणें त्याला पंख होते. त्याचे योगानें तो चोहींकडे भराऱ्या मारीत फिरे. हा काय प्रकार आहे हें पाहण्यासाठीं हातिम त्याच्या मागोमाग अस्तमान पावेतों हिंडला. अस्तमानीं तो सर्प एका डोंगराचे गुहेंत शिरला, व हातिम तेथेंच राहिला. तेथून जवळच एक नदी होती. तेथें त्यावेळीं पाण्यासाठीं बरेच लोक आले होते. तें पाहून हातिमही उगाच तेथें गेला. तेव्हां हा कोणी प्रवासी जाणून त्या लोकांनीं त्यास जवळ आपल्या गांवांत येण्याविषयीं आग्रह केला. परंतु तो येईना ह्मणून त्यांनीं त्यास कांहीं खावयास अन्न दिलें. तें खाऊन पाणी पिऊन स्वारी गुहेजवळ येऊन पडली. थोड्याच वेळानें कांहीं तांडेल लोक बरींच गुरें मेंढरें घेऊन तेथेंच वस्तीस आले. नंतर ते बिचारे लोक खाणें पिणें आटोपून पडले असतां श्रमामुळें त्यांना गाढ निद्रा लागली. असें पाहून तो सर्प बाहेर येऊन त्यानें दंश करून सकाळला त्यांतील एकही प्राणी जिवंत ठेवला नाहीं! हें पाहून हातिमास फारच वाईट वाटलें. हा अत्यंत भयंकर देखावा सकाळीं गांवकऱ्यांचे दृष्टीस पडल्यावर त्यांनाही फारच वाईट वाटलें. हातिम मात्र जिवंत होता, त्यानें हा प्रकार कसा घडला ती सारी हकीगत त्या लोकांस सांगितली. तें ऐकून तो काळरूप सर्प आहे तरी कसा हें पाहण्यासाठीं पाटील वगैरे बरेच गांवकरी गुहेच्या तोंडाजवळ आले, इतक्यांत मोठ्या वेगानें तो सर्प बाहेर पडून त्यानें दंश करून मुख्य पाटलासच ठार केलें. तेणेंकरून सारे लोक शोकाक्रांत होत्सात्ते माघारे गेले. हातिमही त्या सर्पाचे मागो-

मागें गेला. नंतर रात्रीचें वेळीं सर्पानें कृष्ण रंग धरून एका राजधानींत घुसून तेथील राजा व प्रधान ह्यांचे पुत्र ठार केले. नंतर सिंहाचें रूप धारण करून एका खेड्यांतील एका तरुणास ठार केलें. नंतर सुंदर स्त्रीचें रूप धारण करून एके स्थळीं बसला. तेथें दोघेजण भाऊ प्रवासांत असतां आलेले पाहून शोकयुक्त होत्साती ती त्यांस कळवळा येईल अशा प्रकारें हेल काढून रडूं लागली. तेणें करून त्यांस दया आली व त्यांनीं तिची पुसतपास केली. ती मायावीच असल्यामुळें, ह्मणाली, माझा पति येथपर्यंत मज बरोबर येऊन तो ह्या रानांत हरवला ! आतां मी काय करावें? कोठें जाऊं? असें बोलून पुढें खूपच मोहजाळ पसरलें. तिचा अटखर नाजुक बांधा, गौरवर्ण, तारुण्याची भरज्वानी आणि निराश्रितपणा पाहून वडील भावानें बायकोप्रमाणें वागण्याचा करार करून घेऊन तिला आपलीशी केली. तिनें त्याशीं संबंध ठेवण्यापूर्वी स्वयपाक न करणें, माझ्या व्यतिरिक इतर स्त्रीशीं प्रेम संबंध न करणें व मी वागेन तशी मला वागूं देणें ' अशा अटी त्याचे पासून कबूल करून घेतल्या होत्या. पक्कीच ती त्या दोघांचा ती मृत्युच बनलेली. तिनें थोडा मार्ग क्रमण केल्यावर क्षुधा लागली असें सांगून वडील भावास शिधा अणण्यासाठीं जवळच्या गांवांत पाठविलें. नंतर धाकट्या भावाशीं पतीप्रेमनातें जोडण्याचा उद्योग करूं लागली. तो बिचारा सात्विक पुरुष होता, तिच्या लाघवी भाषणाला तर भूलला नाहींच. पण तिनें माझें ऐकत नाहीं तर मी तुमच्यावर भलतेंच कुभांड रचीन असा धाकही घातला तरी तो डगमगला नाहीं. शेवटीं वडील भाऊ जवळ आला असें पाहून वेणी विसकटून लुगडें फाडून तिनें तेथें आक्रोश मांडला. तो येतांच हा तुमचा भाऊ मजवर जुलुम करतो आहे असें सांगून तिनें त्यास कोपाविष्ट केलें. धाकट्या भावानें खरा मजकूर त्यास निवेदन केला.

परंतु सारें व्यर्थ. वडीलभाऊ लागलाच निकरावर आला, हें पाहून धाकटाही निकरावर आला. शेवटीं दोघांची भयंकर लढा लढी होऊन दोघेही एकमेकापासून मेले गेले. नंतर तिनें एका झशीचें रूप धारण करून एका गांवांत शिरून खूप धांदल उडवून बरेच लोक ठार केले व पुन्हां वृद्ध मनुष्याचें रूप धारण केलें. तें पाहतांच हातिमानें त्याचे पुढें होऊन त्याचें सर्व कृत्य बोलून हें काय बंड आहे ह्मणून मोठ्या आर्जवानें त्याला विचारलें. त्यानें प्रथम तर त्याला झिटकारलेंच, पण मग हातिमानें त्याचा पिच्छाच घेतल्यामुळें तो ह्मणाला, मनुष्याचा हंता जो यम तोच मी आहें. ज्याचें ज्या रीतीनें मरण असेल त्याप्रमाणेंच मी रूपें घेऊन त्यास मारतों. तें ऐकून हातिम ह्मणाला, माझा मृत्यु कशानें होईल तें मला सांगालका? यम ह्मणाला रे हातिमा, तुला दोनशें वर्षें आयुष्य आहे. अद्याप निम्मेही त्यांतून संपलें नाहीं. परोपकारार्थ तूं आपलें आयुष्य खर्च करतोस येणेंकरून ईश्वराची तुजवर दया आहे. मरण प्रसंगीं तुझे नाकांतून रक्तश्राव होऊं लागेल, तोंपर्यंत तूं परार्थच उद्योग कर. इतकें बोलून तो गुप्त झाला.

नंतर हातीम तेथून चालता झाला, व कांहीं दिवसांनीं काळ्या रंगाच्या अरण्यांत आला. तेथें जिकडे तिकडे काळेंच काळें. तेथून जातांना एक भयंकर काळा सर्प त्याचे अंगावर धांवला. हा भयंकर प्रसंग पाहून हातिमानें आपला सोंटा त्याचे पुढें टाकला. तोंच तो हतवीर्य होऊन निघून गेला. पुढें त्यास पांढरें, त्या पुढें पिवळें अशीं अरण्यें लागलीं. तेथें त्याच रंगाचे सर्प त्याचे अंगावर आले. तेथूनही तो सोट्याचे योगानें सुरक्षित सुटून पुढें तांबड्या रंगाचे अरण्यांत गेला. तेथें जिकडे तिकडे लालरंगाचेच सर्प. हेंच त्याचें इष्ट स्थान होतें, त्यामुळें त्यास परमसंतोष झाला. त्या अरण्यांतील जमीन, वृक्ष, पा-

षाण वगैरे जी कांहीं वस्तु ती सारी रक्तासारखी लाल. तेथें कहर उष्णता असे. तो प्रदेश हातिमास अत्यंत दुःसह होऊन थोड्या अवकाशांत तो अगदीं मुर्च्छित होऊन पडला. इतक्यांत एक वृद्ध पुरुष एकाएकीं त्याचे पुढें येऊन 'रे वीर पुरुषा, तें आस्वल कन्येचें मोतीं तोंडांत धर' असें बोलून तो गुप्त झाला. हातिमानें तसें करतांच त्याचे जिवास परम समाधान झालें. तेणें करून ईश्वराचे बहुत आभार मानून तो पुढें निघाला. त्या अरण्यांत रक्त वर्णाचे महा विखारी सर्प मनस्वी असल्यामुळेंच तेथें येव्हढी उष्णता हें त्या वृद्धापासून हातिमास कळलें होतें. व तेंच त्याचें इष्ट स्थान असल्यामुळें त्यास मोठी हुशारी वाटून तो पुढें चालला. मग जेव्हां तो अरण्याचे मध्य प्रदेशीं आला तेव्हां शेकडों रक्त सर्प त्याचे अंगावर धांवूं लागले. कितीएकांचे तोंडांतून भयंकर विषारी ज्वाळा निघत होत्या. त्या सर्पांत एक फारच प्रचंड नाग होता. त्याचे तोंडांत तो हिरा चमकत होता. मग हातिमानें विलंब न करतां पटकन त्या सर्पांचे अंगावर सोटा फेंकला, तोंच बहुतेक सर्प पळाले. व तो सर्पराजही हिरा टाकून गेला. मग ज्याचे ठायीं जलाची बाधा, अग्नीची बाधा विषाची बाधा, न होणें, नेत्र रोग नष्ट होणें, यश प्राप्त होणें इत्यादि बहुत गुण आहेत असा तो हिरा घेऊन हातिम तडक तेथून निघून आपले मित्रास भेटला. मग तो हिरा कसा प्राप्त झाला वगैरे नीट त्यास सांगून त्याचेकडून तो जादुगारास देवविला. ह्याप्रमाणें दोन अटी तर पार पडल्या. आतां तप्त कढईतून बाहेर पडणें येव्हढीच अट राहिली. ती मात्र त्याला स्वतांच करणें भाग आली. परंतु हातिमाचे सहाय्यानें व अस्वल कन्येनें दिलेल्या मोत्याचे सहानें तेंही कृत्य शेवटास गेलें. जादुगारानें प्रचंड कढईंत खूप तेल कडकडविलें. त्याचवेळीं हातिमानें अस्वल कन्येचे मोतीं त्याचे तोंडांत धरावयास देऊन

निर्भयपणें त्यास कढणींत उडी टाकावयास सांगितलें. तोही ईश्वरावर भरंवसा ठेऊन कढणींत उतरला. पण आपण थंडगार पाण्यांत जणूं पोहोंतच आहों असें त्यास वाटलें. असो. अशा रीतीनें त्यानें तिन्ही अटी पूर्ण केल्या. अर्थात जादूगाराच्या कन्येवर त्याची सत्ता कायम झाली. हें जाणून तो जादूगार आपले मंत्रतंत्रें करून त्यास ठार मारण्याचे उद्योग करूं लागला. हें हातिमाचे ध्यानांत येतांच स्वसामर्थ्यानें त्यास पोटभर दम देतांच त्यानें निमुटपणें लग्न सोडळ्याची तयारीच आरंभिली.

मोठ्या थाटानें तें लग्न झालें. नंतर आपले मित्राची इच्छा पूर्ण झाली असें जाणून हातिम दुसरे मित्राचे कामास चालता झाला. नंतर तो थोड्याच दिवसांत अलकन पर्वता निकट आला. फारच भयंकर तो पर्वत. गगनमंडळास भेदून त्याचीं शिखरें वर गेलीं होतीं. मग त्यावर चढण्यास तो मार्ग शोधीत आहे तोंच जवळ कांहीं गंधर्वकन्या क्रीडा करीत असतांना त्याचे दृष्टीस पडल्या, ह्मणून तो त्यांचे जवळ जाऊं लागला; तोंच त्या एकदम नाहींशा झाल्या. हें पाहून हातिम शुद्ध वेडाच बनला. नंतर जवळ पास पाहतों तों एक भुयार मार्ग तेथें त्याला दिसला. तेव्हां त्या स्त्रिया ह्याच मार्गानें गेल्या, अशी कल्पना करून तोही त्या मार्गानें जाऊं लागला. नंतर बहुत वेळानें पाहतोतों अंधारमय अशा मैदान प्रदेशावर आपण आहोंत असें त्याला वाटलें. परंतु थोड्याच अवकाशानें सूर्योदय होऊन स्वच्छ प्रकाश पडला. तेव्हां तें एक विस्तीर्ण मैदान असून जवळ एक सुंदर बगीच्या व त्यांत एक बंगला आहे, असें पाहून तो तेथपर्यंत गेला. तों पूर्वी दृष्टीस पडलल्याच स्त्रिया त्याचे दृष्टीस पडल्या. त्यांची ही नजर त्यांच्यावर आली तेव्हां तूं कोण कोठून आलास वगैरे त्यांनीं ह्यास विचारलें. तेव्हां अलकन पर्वत पाहण्याच्या इच्छेनें हिंडत असतां काल तुह्मीच माझे

दृष्टी पडलांत तेव्हां तुमचे मागोमाग विवर मार्गानें आलों. वगैरे सर्व सांगून हा कोणता प्रदेश वगैरे त्यानेंही त्यांस विचारलें. त्या ह्मणाल्या, ह्याला अलका प्रदेश ह्मणतात, अलकनपरी नामक गंधर्व कन्या येथची मालकीण आहे. ह्या बागेंत ती उद्यांच राहण्यास येणार आहे. असो. तूं आतां येथून जा, तिचे दृष्टीस पडल्यास ती आह्माला मार देईल. तो ह्मणाला, मी येथवर जो आलों, व जी प्रवासांत येव्हढीं संकटें भोगिलीं तीं केवळ तिच्याच भेटीसाठीं ? आणि अनायासें भेटीचा प्रसंग आला असतां भीतीनें तो व्यर्थ घालवूं काय ? छीः मी आतां जाणार नाहीं. ती मला मारील तर मारो. तें ऐकून हा कोणी वेडा असावा असें समजून त्यांनीं त्याला बरेंच बुकंदिलें, तरी तो तेथून पाऊलभरही हालला नाहीं व कांहींही बोलला नाहीं. तेणेंकरून त्या परीस त्याची दया येऊन त्या ह्मणाल्या, 'रे तुला राणीची गांठ घेणेंच आहे तर ये आमचे मागोमाग.' असें बोलून त्यास एका गुप्त जागीं बसवून त्याची खाण्यापिण्याची वगैरे त्यांनीं व्यवस्था लावली, व भेटीचे वेळीं हातपाय बांधून नेऊं, पुढें तुझें तूं आपलें पहा असें सांगून त्या गेल्या.

संकेताप्रमाणें अलकनपरी तेथें आली. नंतर एक अर्ध दिवसांत ती शांतवेळीं बागेंत कर्मणुकीस्तव बसली असतां ही योग्य संधी जाणून एकीनें जाऊन हातिमास आणून राणीचे मागले बाजूस वृक्षाआड उभें केलें. त्यावेळीं तिचें तें अमानुष सौंदर्य पाहून तो बेशुद्धच होऊन पडला. इतक्यांत एका सिद्धानें त्यास सावध करून ह्मटलें 'हातिमा, तुला करावयाचें काय व करतोस काय? तें ऐकतांच तो झटकन ताळ्यावर आला. इतक्यांत प्रसंग पाहून एकजण राणीस ह्मणाली—सरकार, नुकताच एक मानव प्राणी कोण जाणें कसा येथें आला तो ! पण त्यास आह्मी अटकेंत ठेवलें आहे. तर आतां काय तो हुकूम व्हावा.

ते शब्द ऐकतांच 'सातवे दिवशीं भेटेन' असें ज्यास आपण सांगि- तलें तोच हा असावा असा विचारकरून तिनें त्यास आणावयास सांगितलें. लागलेंच दासीनें हातिमास तिचेपुढें उभें केलें. मग हा कोणी वेंगळाच असें समजून त्यास एका बैठकीवर बसवून कोण, कोठील वगैरे विचारलें. तिला जवळ पाहतांच हातिमाची बरचि धांदल उडून त्याला कांहीं उत्तर सुचेना. शेवटीं बऱ्याच वेळानें 'मी इमनचा राहणारा, माझें नांव हातिम' इतकें बोलत आहे तोंच ती उठून ह्मणाली-हे परोपकारी पुरुषा, तुझी कीर्ति मी ऐकली आहे, मी आपले दर्शनेकरून धन्य झालें. बरें असो, आपण येथें येण्याचें कां बरें श्रम घेतले तें कळवावें. मनांत धास्ती ठेऊं नका. मग प्रथम तर केवळ 'आपली कीर्ति ऐकून येथें आलों इतकें सांगून हिमयार वनांतील कच्ची हकीगत तिला सांगितली. तें ऐकून ती चकीत होऊन ह्मणाली, हो गोष्ट खरी; माझीच चूक झाली खरी. मला आठवणच राहिली नाहीं. असो. पण मी ह्मणतें कीं, त्याची जर मजवर खरी प्रीति आहे तर त्यानेंच येथपर्यंत कां येऊं नये? त्याला हें स्थळ मी सांगितलें होतें. हातिम ह्मणाला 'वाहवा! त्यानें तेथून कसें हालावें? मी येथें येऊन तूं जर येथें भेटला नाहींस तर पुन्हां भेट होणार नाहीं असें तूं त्याला सांगून ठेवलें होतेंस ना? त्यामुळें तो बिचारा आज सात वर्षें अन्नपाण्यावांचून मृत पडला आहे. हें खऱ्या प्रीतीचें लक्षण नव्हे काय? अलकनपरी ओशाळून ह्मणाली, तें खरें; पण माझी त्या वरची प्रीति अजिबात उडाली. आतां के- वळ तुमचे आग्रहास्तव मी त्याला येथें आणीन पण कोणत्याच प्रकारचा संबंध ठेवणार नाहीं. तें ऐकून हातिमाला बहुत राग येऊन तो ह्मणाला, हें बोलणें फारच वाईट, आधीं एखाद्यास प्रीति लावून नंतर त्यास फशीं पाडणें हें फारच निंद्य होय. त्यानें तुझेसाठीं अन्नपाणीही सोडलें; आणि तूं असें ह्मणतेस

हें काय ? असो. इतकाच जर तुझा दृढ संकल्प असेल तर मीही अन्नपाण्याविरहित तुझ्या दाराशीं पडून प्राण देतों. असें बोलून ती परी उठून गल्यावर बोलल्याप्रमाणेंच खाण्यापिण्यावांचून एका वृक्षाखालीं हातीम पडून राहिला. इतकें जरी त्यानें केलें तरी परीनें आपला हेका सोडला नाहीं, आणि तोही तेथून हलला नाहीं. शेवटीं ईश्वरासच त्याची दया येऊन एका महंताचे रूपानें त्यास भेटून ह्मटलें—हातिमा, कां घाबरतोस; तुझे मित्रास येथें येऊं तर दे. आस्वल कन्येचें मोतीं तुजपाशीं आहेच, ते पाण्यांत भिजवून तें पाणी त्याचेकडून तिचे पाण्यांत जाईल असें कर ह्मणजे तुझें कार्य झालें ह्मणून समज. इतकें स्वप्न पाहून हातिम जागा झाला. व ईश्वर वेळोवेळ आपणास मदत करतो असें जाणून त्याचीं स्तोत्रें गाऊं लागला. इतक्यांत अलकनपरी ही तेथें येऊन ह्मणाली अहो महाराज, हा काय आपण त्रागा मांडला आहे ! अशानें तर आपण सहज मृत्युमुखीं पडाल; व व्यर्थ आपले हत्येचें पाप माझे माथीं बसेल. हातिम ह्मणाला बरें तर मी आपला हट्ट सोडतों, पण येव्हढें तरी करा कीं, त्यास येथें आणवा. ह्मणजे तो आपला मुखचंद्र पाहून तेवढ्यानेंच तरी त्याचें समाधान होईल. अलकनपरीनें तें मान्य करून तत्काल खाणाखुणा सांगून कांहीं दासी त्याला आणण्यासाठीं हिमयार आरण्यांत पाठविल्या. दासी थोड्याच दिवसांत त्या गृहस्थास तेथें घेऊन आल्या. राणीचा मुखचंद्रमा त्याचे दृष्टी पडतांच जणूं हें सत्य किंवा स्वप्न असें त्यास होऊन तो निर्भान होऊन गेला. त्यामुळें राणीनें त्याचे अंगावर पाणी शिंपडून त्यास सावध करून ह्मटलें, आतां तूं मजकडे पाहत राहून आपली इच्छा तृप्त करून घे. त्यानेंही तिचें दर्शनसुख घेण्यांत आळस केला नाहीं, तहान भूक विसरून सारा दिवस त्याचे डोळे परीचे ठायीं राहिले. रात्रीचेवेळीं सर्व मंडळी

एका दिवाणखान्यांत बसली. तेथें फारच सुंदर रोषनाई केली होती. थोड्याच अवकाशांत तेथें नृत्यगायनासही प्रारंभ झाला. निशिथसमय हा काम देवाचें प्राबल्य दुणावणारा असल्यानें तो लोलुप पुरुष मदनप्रभावानें फारच गांजला गेला. हें जाणून हातिमानें मोत्याचें पाणी तयार करून त्याच्या कडून राणीच्या साठीं ठेवलेल्या पाण्यांत तें टाकविलें. तो तें पाणी, पाणी ठेवलेल्या भाड्यांत टाकीत असतां एका दासीनें पाहून हें तूं काय केलेस झणून त्याला विचारलें. तेव्हां त्यानें मोठ्याच चातुर्यानें तिचें समाधान केलें. शिवाय आणखी एक दासी त्यांतील पाणी घेऊन आतां पिणार तोंच हातिमाचें तिकडे लक्ष जाऊन ' धनीनीसाठीं ठेवलेल्या वस्तूचा चाकरांनीं स्वीकार करणें हें अगदीं अनुचित असें सांगून तें पाणी परत भाड्यांत टाकविलें. हातिम अगदीं त्यावर पहाराच करीत होता. किंचित् वेळानें राणीस तहान लागून ती तें पाणी प्याली. तेणेंकरुन हातिमास परम आनंद झाला. इकडे तिचे ठायीं मदनी व्यथा प्रगट होऊन तिनें बेधडक त्या आपल्या प्रियमित्रास गाढालिंगन दिलें. हातिमास येणेंकरून संतोष झालाच तरी उगाच झणाला गे राणी, हें काय तुझें वर्तन ! माझ्या मित्रास स्पर्श करावयाचा नाहीं असा तुझा संकल्प एकाएकीं मावळून हें तूं काय करतेस ? ती झणाली, रे परोपकारी पुरुषा, तूंच हा खेळ जमविलास, व विचारतोस तर मी आतां काय सांगूं ? असो. आतां मी ह्याशीं लग्न तर करणारच पण ह्यासाठीं बापाची परवानगी घेऊन आतांच येतें. असें बोलून ती अलकाकल पर्वतावर जाऊन आईचे मध्यस्तीनें तिनें बापाचा रुकार मिळविला; आणि तेथें त्या दोघांस आणवून लग्न लावून घेतलें. नंतर हातिमास हिमयार अरण्यांत जावयाचें असें राणीनें त्यास विचारून घेऊन दासीकडून एक दोन घटकांतच हातिमास तेथें

नेउन सोडलें. तो विमान गतीनें जात असतां मार्गांत 'कोणाचें वाईट करूं नका, कराल तर तुह्मांवर अनेक संकटें येतील' असें वाक्य त्याचे कानीं आलें. त्याचेच शोधास तो जात असल्यामुळें तेथेंच उतरून त्यानें विमान परत लावून जिकडून शब्द एकूं येत होता त्याचाच रोख धरून चालला. पाहतो तों एका वृक्षास एक मला मोठा पिंजरा टांगला असून त्यांत एक मनुष्य बसून तोच वरील शब्द थांबून थांबून ह्मणत आहे. त्याच्या डोळ्याच्या अगदीं खांचा होऊन गेल्या असून शरीर अगदींच शुष्क झालें होतें असें हातिमाच्या दृष्टीस पडलें. तेणेंकरून त्याला फारच वाईट वाटून तो पिंजऱ्या जवळ जाऊन त्या मनुष्याची पुस तपास करूं लागला. तो मनुष्य ह्मणाला, सांगूं तरी आतां कितीकांस, आणि तूं ऐकून तरी करणार काय? जा आपल्या वाटेनें. हातिमानें केवळ परार्थेच जन्म घेतला होता. तो पुढें कसा जाणार. त्यानें 'तुला दुःखमुक्त करीन असें त्यास वचन देऊन हकीगत सांगावयास लावलें.

तो ह्मणाला, माझे नांव हिमयार माझा बाप मोठा व्यापारी होता. तो मोठमोठीं जलपर्यटनें करी. एके वेळीं तो फारच लांबच्या सफरीस गेला. इकडे मी घरीं राहून चैनी लोकांच्या संगतीनें घरांतील सर्व द्रव्य निकालास लावून बाप येण्याची मार्गप्रतीक्षा करीत राहिलों. दुर्दैवानें माझा बापही तुफानांत सांपडून निकालास लागला. तेणेंकरून तर मी फारच संकटांत पडलों. नंतर एके वेळीं बाजारच्या रस्त्यानें हिंडत असतां एका मांत्रिकाची माझी गांठ पडून मी त्यास घरीं आणून माझी कची हकीगत सांगितली. नंतर त्यानें माझे घरांत चोहींकडे हिंडून ह्मटलें ' ह्या घरांत असंख्य द्रव्य पुरलें आहे. जर तूं त्यांतील चतुर्थांश मला देशील तर तें सारें द्रव्य मी तुला दाखवीन. तें ऐकतांच मला मोठाच हर्ष होऊन मी त्यास

कबूली दिली. नंतर मांत्रिकानें मला एक दोन द्रव्य स्थळें दाखवून मजकडून जागा खणवून मोहरांनीं भरलेले कांहीं हांडे बाहेर काढले. मग काय! आह्मीं आपलें वचन एकीकडे झुगारून दोन चार मोहरा त्याचे हातावर ठेऊं लागलों, तो त्या कशाचा घेतो! शेवटीं दहा पांच ठोंसे देऊन मी त्याची किट-कीट दूर झुगारली. ह्यानंतर थोड्याच अवकाशानें तो मांत्रिक मजकडे येऊन ह्मणाला गड्या, तूं मारलेंस त्याचा मला राग नाहीं. विद्यासामर्थ्यानें मी हवें तेवढें द्रव्य मिळवीन, तुझ्या सारखा मला कोणी सहाय्य मात्र पाहिजे. ह्या त्याच्या लाघवी भाषणानें मला मोठा हर्ष होऊन मी त्याशीं मैत्री केली. नंतर कांहीं दिवसांनीं त्याची ती विद्याही मला कळण्याची इच्छा उद्भवली. त्या बेट्याला हेंच पाहिजे होतें. तो ह्मणाला, ती विद्या बिद्या कांहीं नाहीं, तें एक अंजन आहे. डोळ्यांत घालतांच कोठें भूमिगत द्रव्य असल्यास दृष्टी पडतें. तुझी इच्छा असल्यास जेथें मनुष्याचा वाराही नाहीं अशा स्थळीं चल ह्मणजे तें अंजन तुझे डोळ्यांत घालीन. तें मी मान्य करतांच अंजन तयार करण्याच्या निमित्तानें एक दोन दिवसांचा अवकाश घेऊन त्यानें मला येथें आणिलें. मी येण्या पूर्वीच हा पिंजरा येथें टांगला होता. असो. नंतर त्यानें ती दुष्ट अंजनाची डबी उघडून दोन्ही बोटांनीं तें झरझरीत अंजन माझ्या डोळ्यांत कोंदून खांचा करून टाकल्या. सारांश, माझे कर्माप्रमाणें मला फल प्राप्त झालें. महाराज, त्यादिवसापासून मी ह्या पिंजऱ्यांत बसून आहें. आणि ‘ कोणाचा घात करूं नका, आणि कराल तर तसें फळ भोगाल. ’ असें वाक्य अवकाशा अवकाशानें उच्चारीत असतों. अशीं सुमारें तीन वर्षें गेलीं. येथून बिल-कूल हलवत नाहीं. एकदां बाहेर पडलों, तों अंगांत एकदम शिणका उठून वांचतों कीं मरतों असें झालें. असो. त्यानें मला

असेंही सांगितलें होतें कीं, हे शब्द ऐकून येथें कोणी उदार पुरुष येईल. त्यानें जर हिमयार अरण्यांतील सूर्य कमलाचा रस काढून तुझे डोळ्यास लावला तर डोळे पूर्ववत होतील. तें ऐकून त्यास धीर देऊन ईश्वरावर भरंवसा ठेऊन तो त्या अरण्याकडे निघाला.

इकडे अलकनू परीचे सेवक हातिमाची आज्ञा घेऊन विमानासह अलकनू परीकडे आले, तेव्हां ती त्यांस ह्मणाली हातिमास कोठें वसतीस्थानीं न पोंचवितां आलांत हें ठीक नाहीं केलें. तर आतां त्याचेकडे जाऊन तो शहाबादेस परत जाई पर्यंत त्याचे तैनातींत असा. ह्यामुळें ते बिचारे तसे मागें फिरून हातिमास भेटून सर्व हकीगत सांगते झाले. हें अनायासेंच हातिमास सहाय्य मिळाल्यामुळें हिमयार अरण्यांतील सूर्यकमलें शोधण्यास जावयाचें असें त्यास ह्मटलें. सेवक ह्मणाले, अबब तेथपर्यंत आमच्यानें येववणार नाहीं. एकदां कमलांचा हंगाम सुरू झाला कीं तेथें सूर्या सारखें प्रखर तेज पडतें. व त्यावेळीं सुगंध लोभानें हजारों महा विषारी सर्प तेथें असतात. हातिम ह्मणाला चिंता नाहीं. तुमच्यानें जाववेल तेथ पर्यंत मला घेऊन जा ह्मणजे मी माझें कार्य करून घेतों. तें ऐकून सेवकांनीं त्यास विमानगतिनें सूर्यकमलाच्या निकट प्रदेशीं नेऊन सोडलें. त्यावेळीं हंगाम नसल्यामुळें सेवकांनीं सांगितलें तसें कांहीं हातिमास दिसलें नाहीं. सबब मुसमाचे दिवस येई पर्यंत हातिमानें तेथें चौवीस दिवस लोटले. हंगाम येतांच जिकडे तिकडे लख्ख तेज पसरून सर्व प्रदेश सुगंधमय झाला, व मोठमोठाले भयंकर भुजंग, विंचुही तेथें बहुत हिंडूं लागले. नंतर आतां सूर्यकमलें आणावयाचा असा संकेत करून आपले तें प्रियमोतीं जवळ घेऊन हातिम त्या भयंकर प्रदेशीं निर्भयतेनें गेला. मोत्याचे योगानें एकही विषारी प्राणी त्याचे पुढें टिकला

नाहीं. मग हातिमानें शांतपणें हवीं तेवढीं कमळें घेऊन परत आला. तेणेंकरून हा कोणी अद्वितीय पुरुष असावा असें सेवकांस वाटलें. असो. मग लागलाच विमानांत बसून तो आपले मित्राचे पिंजऱ्या जवळ येऊन चटकन त्यानें येतांच कमळरस त्या अंधाच्या नेत्रांस लावला. तों त्याचे पूर्ववत डोळे झाले. हे त्याचे पर्वतप्राय उपकार जाणून तो वृद्ध ह्मणाला-रे साधु पुरुषा, आतां माझे घरीं चल, तूं माझेसाठीं अतोनात कष्ट घेतलेस. मजजवळ संपत्ति बहुत आहे, तर आतां त्यांतून तुला हवी तितकी घे. हातिम ह्मणाला, ती तूं दीन, अनाथ, व्यंग अशा लोकांस वाटून दे. त्यांतच तुझें कल्याण आहे. इतकें बोलून लागलाच विमानांत बसून तो शहाबादेस येऊन पोंचला. नंतर सेवकांस परत लावून बानूस भेटून तिच्या प्रश्नाचा निकाल सांगता झाला. तेणेंकरून बानूस परम समाधान झालें. नंतर मुनीरशहासह तेथें त्या दिवशीं भोजन झालें. मग एक अर्ध्या दिवसांनींच तिचा चौथा प्रश्न जो 'खरें बोलणारा नेहमीं सुखी असतो' असें बोलणारा मनुष्य असें कां बोलतो ह्याचा खुलासा काढणें. ह्या साठीं हातिम चालता झाला. हा मनुष्य काराम नामक शहरीं राहतो हें बानूपासूनच त्याला कळलें होतें. त्यामुळें तो त्या नगरच्या रस्त्याचा शोधच करीत चालला.

---

# सवाल चवथा.



## खरें बोलणारा नेहमीं सुखी असतो.

हातिमाच्या पर्यटनाची ही चौथी आवृत्ति. ह्यावेळीं जेथें जावयाचें त्या स्थळाचें नांव ठाऊक होतें, परंतु तेथचा रस्ता ठाऊक नसल्यामुळें तो आपला भटक्या मारीत हिंडूं लागला. अशा प्रकारें जात असतां एक प्रचंड नदी एका पर्वतास वळसा

रून जात होती तेथें गेला. त्या नदीचें पाणी रक्तासारखें
ताल होतें. हें असें पाणी कां असावें? अशी त्यास शंका
येऊन ह्याचा शोध करण्यासाठीं तिचे उगमाकडेच जाऊं ला-
गला. पुढें अगदीं शेवटपर्यंत जाऊन पाहतो तों एका प्रचंड
वृक्षास स्त्रियांचीं असंख्य शिरें टांगलीं आहेत, त्या सर्वांत उंच व
मध्यभागीं असलेलें शिर फारच सुंदर होतें. व त्या सर्वांपासून
रक्ताचा वर्षाव चालू असून वृक्षाचे मूळाशीं एक पाण्याचा झरा
होता, तेथूनच नदीचा प्रवाह चालू असून त्यांतच तें रक्त पडत
असे. हें पाहून हातिमाला फारच आश्चर्य वाटलें. व तो ति-
कडे पाहत आहे तों तीं शिरें ह्याला पाहून हसूंही लागली. हें
पाहून तो तर क्षणभर निर्भानच झाला. व मग हें असें कां ह्या
विषयीं त्याला फारच जिज्ञासा उत्पन्न झाली. त्यामुळें तो रात्र
होई तों पर्यंत तेथेंच राहिला. नंतर रात्रीचे वेळीं फारच अद्भुत
गोष्ट घडली. ती अशी कीं, रात्र होतांच सगळीं शिरें आपो-
आप नदींत कोसळलीं. आणि तत्काळ तेथील पाणीबिणी
नाहींसें होऊन एक सुंदर महाल तेथें बनून शिरा इतक्याच
स्त्रिया बनून तेथें आनंदानें वागूं लागल्या. त्या सर्वांत एक
फारच सुंदर होती. इतर स्त्रिया साऱ्या तिच्या दासी होत्या.
कांहीं वेळानें त्यांनीं तेथें उत्तम स्वयंपाक करून भोजन केलें. त्या
वेळीं त्यांनीं एका स्त्री कडून हातिमाकडेही एक ताट पाठविलें.
तिनें हातिमापुढें ताट ठेवून ह्मटलें आमचे राणीनें हें आपणा
साठीं पाठविलें आहे; तर हें स्वीकारावें. ह्या महत्वाच्या गोष्टीचा
शोध करणें हातिमास अगदीं अवश्य असून अनायासें ही संधी
आल्यामुळें तो ह्मणाला.-हे स्त्रिये, मजवर अशी दया करणाऱ्या
त्या तुझ्या परोपकारी राणीचें नांव काय बरें? ती ह्मणाली-तें
सांगण्याचा आह्मांला हुकूम नाहीं. हातिम ह्मणाला तर मग हा
एकंदर सर्व प्रकार मात्र कळल्यावांचून मी तुमच्या अन्नास स्पर्श

करणार नाहीं. असा हा खडखडीत मिळालेला जबाब दासीनें राणीस कळविला. तेव्हां 'आज तूं जेव उद्यां तुझी इच्छा पूर्ण करूं' असा राणीनेंही उलट जबाब पाठविला. तरी हातिमानें दुराग्रह सोडला नाहींच, पण उलट तिला तो जाऊं देईना. परंतु ती त्यास हुलकावणी देऊन परत आली. नंतर रात्रभर त्यांनीं तेथें पोटभर रंगविलास केले; आणि उजाडतांच आपल्या पूर्व स्थितींत येऊन राहिल्या. दुसरे रात्रीं पुन्हां त्या पूर्वरात्री प्रमाणेंच विलास करूं लागल्या. नंतर स्वयंपाक होऊन त्यांची भोजनाची तयारी होतांच पूर्वीची स्त्री हातिमाकडे आली. हातिमानें तिला पूर्ववतच जबाब दिला. तेव्हां ती ह्मणाली, आपण भोजन करून माझे बरोबर बंगल्यांत चला ह्मणजे आपला हेतू पूर्ण होईल. तें ऐकून हातिम भोजन उरकून तिचे मागोमाग निघाला. तिनें कांहीं थोडें चालून एका पाण्याच्या डोहांत बुडी मारली. हातीमही तिचे पाठोपाठ डोहांत गेला. पुढें जेव्हां जमीनीस पाय टेंकले, तेव्हां पाहतो तों घोर राक्षसांच्या वस्तींत आपण आहोंत असें त्याचें अनुमान झालें. तेव्हां आपण कोठच्या ठिकाणाहून कोणच्या रस्त्यानें कोठें आलों? हें आहे काय? ह्याबद्दल त्याला फारच आश्चर्य वाटलें. नंतर तेथून उदासवृत्तीनें हिंडत असतां आठवे दिवशीं एका अवलियाची गांठ पडून तो त्यास ह्मणाला, रे राजा हातिमा तूं शहाणा आहेस. तूं ह्या घोर राक्षसांच्या वस्तींत कसा आलास. तूं ज्या पाण्याच्या डोहांत बुडी मारलीस तो येथून दहा हजार कोस लांब राहिला. तें ऐकून तो निराशतेनें अत्यंत शोकयुक्त झाला. तेणेंकरून अवलियास त्याची दया येऊन तो ह्मणाला राजा, शोकाचा त्याग कर व तुला कोठें जावयाचें आहे तें मला सांग. हातिम ह्मणाला, मला जेथून मी येथें आलों तेथेंच जावयाचें आहे. तें ऐकून अवलियानें झोळींतून एक

सोटा काढून त्याचे हातीं देऊन ह्मटलें, आतां तूं डोळे झांक ह्मणजे इष्ट स्थळीं जाशील. त्याप्रमाणें करतांच शिरें टांगलेल्या वृक्षाजवळ तो येऊन पोंचला. तेणेंकरून त्यास परम संतोष होऊन कांहीं वेळानें तो त्या वृक्षावर सर्वांत श्रेष्ठ शीर काढण्यासाठीं चढूं लागला. तों प्रचंड वारा सुटून तो बऱ्याच उंचीवरून खालीं पडला. नंतर पुन्हांही तो पूर्ववत चढूं लागला. तेव्हां एकाएकीं तो वृक्ष चिरून त्यांतच हातिम गुंतून गेला. त्यांतून तो अगदीं मरावयाचाच परंतु पूर्वीच्या ऋषीनें ह्याही वेळीं प्रगट होऊन तेथून त्याची सुटका करून ह्मटलें, हातिमा जिवावर तूं उदार कां झालास? ह्याच नादानें भयंकर प्रदेशीं पडला असतां तुझी सुटका केली असून तूं पुन्हा ह्या नादीं लागलासच. हातिम ह्मणाला, सांईजी, दुसरें कांहीं नाहीं. हें काय गारुड आहे तें कळवावें. साई ह्मणाला इतकेंच असेल मी सांगतों. ऐक चित्त देऊन.

वृक्षावरील जें सर्वांत मुख्य शीर तें एका जादूगाराच्या कन्येचें आहे. जो मोठा जादूगार आहे, ह्या कामांत त्याचा हात धरील असा कोणी नाहीं. त्याची कन्या तारुण्यांत आल्यावर एका तरुणावर तिचें लक्ष जडल्यानें तिनें लग्न करण्याबद्दल बापास सुचविलें. तो काय दुष्टच. त्यास अनिवार क्रोध येऊन त्यानें तिची अशी अवस्था केली. दुसरीं जीं हीं शिरें तीं सारीं तिच्या मैत्रिणीचीं आहेत. हा वृक्ष, हीं नदी, हें सरोवर हें सारें त्याचेंच गारुड आहे. रात्रीचे वेळीं जो प्रकार होतो ती केवळ त्याची कृपा. तो येथून दहा हजार कोशांवर ग्रोहान नांवाच्या पर्वतावर राहतो. तरी येथें येण्यास त्याला एक घटका पुरी होते. जावत्काल तो जिवंत आहे तावत्काल ही अशी स्थिति कायम राहणार. हातिम ह्मणाला, असं आहे तर तें शीर मी खालीं काढतों. सांई ह्मणाला न-

करे नको. ह्या नादानेंच प्राणांत संकटें तुला प्राप्त झालीं. आणि आतांतर ठारच होशील. हातिम ह्मणाला असेंच माझें मरण असल्यास तें माझ्यानें चुकवेल काय! ह्मणून मरायची भीती मला मुळींच नाहीं. येवोत आली संकटें तर, मी असें करणार. असें त्याचें निग्रहाचें भाषण ऐकून सांईनें झोळींतून थोडी विभूति काढून झाडावर टाकून त्यास वर चढावयास सांगून आपण गुप्त झाला.

नंतर हातीम क्षणमात्र ईश्वर स्तवन करून वृक्षावर चढूं लागला. मग जेव्हां त्याचा हात त्या सुंदर शिरापर्यंत पोचला तेव्हां एकाएकीं त्याचें धड तुटून खालीं डोहांत पडलें व शीर त्या शिराशेजारीं लटकत राहिलें. रात्रीचे वेळीं इतरांप्रमाणें तोही पूर्ववत होऊन त्यांचे बरोबर करमणूक करूं लागला. त्याला कोणी तेथें कांहीं बोललेंही नाहीं. उजडतांच पूर्ववत धड पाण्यांत व शीर वृक्षावर असा त्याचा प्रकार होऊन गेला अशा अवस्थेंत हातीम आपल्या कर्तव्याला तर असोच पण तो आपण आपल्यालाही विसरून गेला. ह्याबद्दल त्या सांईस फारच वाईट वाटून तो पुन्हां येथें आला व हातिमास कांहीं बोध करावा अशा इच्छेनें त्यानें थोडी विभूती त्याचे शिरावर फेंकली. तोंच तें पाण्यांत पडून आपले धडास चिकटून हातिम पूर्ववत होऊन वर आला, आणि सांईस पाहतांच दंडवत करून ह्मणाला, हे दयाशीला आपण फार फार मजवर कृपा करतां, परंतु त्या भुवनैकसुंदरीचा मला अद्याप लाभ प्राप्त झाला नाहीं. त्यावांचून सर्व त्रिभूवन मला शून्य वाटत आहे. माझी इच्छा पूर्ण होत नसेल तर हा प्राण मी ठेवणार नाहीं. हें प्रतिज्ञोत्तर ऐकून तो सांई उपदेश करण्यास असमर्थ होऊन गेला, व ह्मणाला, तो जादूगार ठार झाल्या शिवाय हें घडावयाचें नाहीं. हातिम ह्मणाला, ठीक

आहे मी आतांच त्याचा निकाल करून येतों. सांई हंसून ह्मणाला, हं थांबा वीरपुरुष, अशांतलें हें काम नाहीं बरें कां! ह्यासाठीं मी एक तुला मंत्र सांगतों. तो तूं वेळोवेळ पठण करीत जा. ह्मणजे तुजवरील संकटें टळून तूं यशस्वी होशील. तें ऐकून हातिम त्यास नमस्कार करून ह्मणाला, मी आपला आज्ञाधारक आहें. सांगावें कायतें. मग साईनें त्यास एक मंत्र सांगून तो त्याकडून पाठ करून घेऊन ह्मटलें कीं, आतांपासून तूं पवित्रपणानें वागत जा, व संकटकाळीं मंत्र पठण करीत जा. नंतर त्यानें त्याचे हातांत एक सोटा देऊन ह्मटलें कीं, तूं आतां देवाचें नांव घे ह्मणजे हांहां ह्मणतां मोद्रान पर्वताचे नजीक जाशील. हातिमानें त्याप्रमाणें करतांच त्याचेठायीं पांखरासारखी गती प्राप्त होऊन तो तद्वत मोद्रान पर्वतावर जाऊन उतरला. पाहातोतों तेथें सर्व ऋतूंतील वृक्ष, लता फळफुलयुक्त होऊन गेल्या आहेत. एक सुंदर टांकें पाण्यानें तुडुंब भरलें आहे. असें पाहून समाधान पावला. नंतर स्नान करून तो तो मंत्र पठण करीत बसला. तोंच त्या मंत्रप्रभावें करून तेथील सारीं जनावरें भयाभीत होत्सातीं एक कोलाहल करून सैरावैरा धावूं लागलीं. तो जादूगार भयाभीत झाला. तेव्हां हें असें व्हाण्यासाठीं त्यानें विद्या सामर्थ्यानें पाहिलें -तेव्हां त्यास समजलें कीं 'कोणी हातीमनामा महाबलाढ्य व दीर्घप्रयत्नी पुरुष येथें आला आहे, तो तुझें बल व्यर्थ करील.' इत्यादि सारा कच्चा मजकूर कळला. तेणेंकरून त्याचे मनाला मोठाच धक्का बसला. तरी त्यानें कांहीं यक्षिणी बोलावून हातिमास वश करून घेण्यास सांगितलें. मग आज्ञेप्रमाणें एकीनें जादुगार कन्येचें रूप धारण केलें व कोणीकडून तरी हातिमाचा मंत्र

चळावा अशा इराद्यानें त्या यक्षिणी हातिम होता तेथें आल्या.

हातिम त्यावेळीं स्नान करून मंत्र पठण करीत होता. स्त्रिया त्याचे भोंवतीं जमतांच तो पाहातो तों तें मायावी स्त्रीरूप पाहून हीच आपली इष्टदेवता अग्रभागीं आली असें जाणून त्यास अत्यंत हर्ष झाला. इतक्यांत ती लाघवी कौटाळीण पुढें होऊन ह्मणाली, प्राणसख्या आपण माझ्या प्राप्त्यर्थ खूप प्रयत्न केला. ह्या योगानें बापानें मजसह सर्वांची सुटका करून मला आपले सेवेस पाठविलें आहे. तर ह्या दासीला आतां पदरीं घ्यावें. हें ऐकतांच हातिमाचा हर्ष गगनांत मावेना! त्यानें चटकन तिचे कंठास मिठी घातली. तीही लागलीच प्रीति दाखवून त्याचे मांडीवर बसली, व ‘ हा आमच्या कुलदेवतेचा प्रसाद ’ असें ह्मणून तिनें त्याला खूप मदिरा पाजली. तोंच त्याचे ठायीं अपवित्रता प्राप्त होऊन तो आपला मंत्र विसरला. व मद्याच्या धुंदींत वेडेवेडे चार करूं लागला. ही योग्य संधी पाहून त्यांनीं त्यास बांधून जादूगाराकडे नेलें. त्यावेळीं त्याचें तें राजऐश्वर्यानें युक्त असें रूप पाहून जादूगारास त्याची प्रथम दया आली. परंतु ‘ हा आपला शत्रु ’ हें ध्यानांत येतांच त्यास प्रचंड अग्नींत टाकण्याची आज्ञा केली. यक्षणींनें तात्काळ त्याप्रमाणें करून धन्यास वर्दी दिली. तेव्हां त्यानें ऐंद्रजाल विद्येनें पाहिलें तों त्यास कळलें कीं, आस्वल कन्येनें दिलेलें मोतीं त्याचेपाशीं असल्यामुळें निर्घोर आहे. तेणेंकरून त्याचे उरांत धडकीच भरली. नंतर त्यास पाण्याचे तळ्यांत टाकण्यास हुकूम दिला. हातीम पाण्यांत पडतांच सर्व दोषातून मुक्त होऊन मंत्र पठण करूं लागला. त्यामुळें जादूगाराची खूपच गाळण उडाली. मग केवळ कन्येचा नाद सोडून हातिमानें येथून जावें ह्याबद्दल त्याला बोध करण्यास यक्षणीस सांगितलें.

घेशील तर सारें द्रव्य तुला देतों. मी तत्काळ शपथ घेतली. तेव्हां तो ह्मणाला शपथेप्रमाणें वागशील तर १०० शें वर्षें वांचशील, इतकें बोलून तो गुप्त झाला. नंतर मी येथें येऊन त्या द्रव्याचे योगानें प्रथम हा वाडा बांधला. मी पूर्वीचा भ-गर्दी कफल्लक व एकाएकीं थोड्या काळांत मला हें वैभव प्राप्त झालें, तेव्हां कोठें तरी दरोडा घातला असें कोणी कोणी कोतवालास सांगितलें. तें ऐकून कोतवाल एके वेळीं मजकडे येऊन विचारूं लागला. मी सारी खरी हकीगत त्याला कळविली. त्यानें तसेंच मला राजदरबारीं नेलें. तेथेंही मी खरेंच बोललों. तेव्हां राजास परम समाधान वाटून त्यानें उलट आणखीं पुष्कळ द्रव्य देऊन माझी रवानगी केली. त्या वेळापासून 'खरें बोलणारा नेहमी सुखी असतो' असें दरवाज्यावर लिहून ठेविलें. असो, आपण येथें आलां येणेंकरून मी आज फारच धन्यता मानतों. इतकें झाल्यावर एक दोन दिवसांनीं हातिम तेथून निघून शहाबादेकडे येऊं लागला. त्या वेळीं जादूगार कन्येविषयीं त्याचें मन उत्सुक होऊन तो तिचे भेटीसाठीं इमन देशाकडेच निघाला. नंतर एका दिवसाचे मजलेवर इमन देश राहिला असतां रात्रीचे वेळीं तो एका वृक्षा खालीं वस्तीस राहिला. त्या वृक्षावर एक राघू व मैना आपसांत कांहीं बोलत होतीं. हातिमास पक्षांची भाषा कळत असल्यानें तो तिकडे लक्ष लावून बसला.

तेव्हां मैना प्रथम ह्मणाली प्रिया, आतां आपण मला सोडून जाणारना? राघू ह्मणाला. तूं कांहीं केलेंस तरी मी जाणार. तेणेंकरून परमेश्वर मजवर कृपावंत होईल. स्त्रियांचे काय? कामापुरतें पाहणें, बायकांचे नादानें अनर्थ ठेवलेच आहेत, एक राजा असाच बायकोचे नादीं लागून पश्चात्ताप पावला. तद्वत माझी पण अवस्था होईल. मैना ह्मणाली तें कसें तें मला

सांगा. राघू ह्मणाला. एक राजा शिकारीसाठीं अरण्यांत गेला. व धांवतां धांवतां एकटाच कोणीकडचे कोणीकडे निघून गेला. रात्रीचे वेळीं त्यास एक बाग लागला. आंत एक उत्तम बंगलाही होता. तेथेंच तो विश्रांतीस्तव शिरला. तह्यानेनें त्याचा प्राण अगदीं कासावीस झाला होता ह्मणून पाहतो तों तेथें एक तळेंही त्याचे दृष्टीं पडलें. तेथें पाणी पीत आहे तों एका आंकड्यास गुंतवलेली एक लोखंडी सांखळी त्याचे हातीं लागली. ती धरून ओढूं लागला. परंतु ती ओढली जाईना. ह्मणून तें काय हें पाहण्याची त्यास विशेष उत्कंठा लागून त्यानें मोठेंच बळ करून ती ओढली. पाहतो तों एक विस्तीर्ण पेटी तिला बांधली आहे, तें पाहून त्यानें ती पेटी उघडली. तेव्हां आंतून एक सुंदर स्त्री बाहेर निघाली. तिनें त्यास कांहीं खावयास देऊन क्षणभर विनोदपर भाषणें केलीं. इतक्यांत राजास आपल्या घरची आठवण होऊन केवळ खूण असें ह्मणून तिचे हातांत बोटांतील आंगटी घालून उठला. तिनें एक मली आंगठीची माळच त्यास दाखवून ह्मटलें. मी राजस्त्री आहें. माझा पतीस विश्वास पटेना ह्मणून त्यानें हा मजसाठीं बंगला बांधून मला त्यानें हें असें पेटींत ठेवलें आहे. तो रात्रीचे वेळीं येथें येऊन मजसह ह्याबंगल्यांत विलास भोगून सकाळीं मला यापेटींत घालून खाण्याचे पदार्थ ठेऊन पेटी बुडवून चालता होतो. आतां कोणी प्रवासी येथें आला तर आपल्याप्रमाणें सहजगत्या त्याचे हातीं सांखळी लागून तो मला वर काढतो, नंतर हास्यविनोदादि गोष्टी घडून जातेवेळीं खूण ह्मणून आंगठी देतो. ह्या माळेंत जेव्हढ्या आंगठ्या आहेत तेव्हढे प्रवासी आजवर येथें येऊन गेले. तें ऐकून राजानें तिला पेटींत घालून पाण्यांत सोडून तेथून तहत घरचा मार्ग सुधारला. ह्या स्त्री चरित्राचे गोष्टीनें त्याचें मन उदास होऊन गेलें होतें.

त्यानें प्रधानादि मंडळीला ही गोष्ट सांगितली. त्यावेळीं त्यांनीं स्त्री स्वभावाविषयीं बहुत गोष्टी सांगून त्याचे मनाचा खटूपणा नाहींसा केला. असो. तात्पर्य हें कीं, पेटींत जरी बायकोस घालून ठेवलें तरी त्या दुष्ट स्त्रीनें दुष्टकर्म सोडलें नाहीं. तशीच तूं माझेशीं वागत नसशील कशावरून ? ह्मणून मी गेल्यावांचून राहणार नाहीं. तुझ्या नादीं लागून मी मुर्खपणा करणार नाहीं. तो पहा हातिम बायकोचे नादीं लागून मित्राचें काम व त्यास दिलेलें वचन विसरून कसा येथें आला आहे तो. अशांतला मी लंपट पुरुष नाहीं.

हें त्यांचें भाषण ऐकतांच हातिमाचें तोंड खरकन उतरलें, व त्याला फारच पश्चाताप झाला. मग तो तत्काळ माघारा फिरून शहाबादेस येऊन पोंचला. चाली प्रमाणें बानूस तिच्या चौथ्या प्रश्नाचें उत्तर दिलें. नंतर ‘ कोहनिदा ’ असा आवाज उत्पन्न होणाऱ्या पहाडाची खबर काय ? ह्याचा शोध करणें हा जो तिचा पांचवा प्रश्न त्यासाठीं तो शहाबाद सोडून निघाला.

# सवाल पांचवा.

### कोहनीदा असा आवाज करणाऱ्या पाहडाची खबर काय ?

ह्यावेळीं हातिम पूसतपास करीत सारखा सहामहिनें हिंडला. पुढें त्यास एक नगर लागलें. त्यावेळीं नगराबाहेर बहुत मनुष्यांचा जमाव जमला होता. तेव्हां हा काय प्रकार असावा हें जाणण्यासाठीं तो जों तिकडे जात आहे तोंच त्यांतील एकजण हातिमाकडे धांवत येऊन ह्मणाला, याहो याहो, आह्मी तुमचीच वाट पाहत आहोंत. तें ऐकून हातिमास आश्चर्य वाटलें.

तो पुढें गेला तोंच एकानें त्याचे पुढें एक पक्कान्नाचें ताट ठेवलें व दुसरीही तशीच ताटें प्रत्येकानें घेतलीं. शिवाय एकीकडे उत्तम कफनी घालून एक प्रेत पडलें होतें. व तेथेंही कांहीं लोक बसले होते. मग हें आहे काय ह्मणून हातिमानें त्यांना विचारलें. तेव्हां एकजण ह्मणाला महाराज, आमचे प्रांतीं अशी चाल आहे कीं, कोणी मनुष्य मृत झाला, मग गरीब असो व मातबर असो; सर्व गावकऱ्यांनीं प्रेतासह बाहेर येऊन आधीं अन्न शिजवावें. नंतर कोणी प्रवासी येऊन त्यानें निदान पांच- घांस तरी घेतले पाहिजेत. नंतर सर्वांचें भोजन होऊन प्रेतास मूठमाती द्यावयाची. त्याप्रमाणें सांप्रत आह्मांवर प्रसंग येऊन आज सातदिवस प्रवाशाची वाट पाहत आहोंत. अन्न मात्र रोजचें वेगळें शिजवावें लागून प्रवाशावांचून आह्मी उपोषित आहोंत. हातिम ह्मणाला, आणि महिनाभर प्रवाशी न आला तर? तो ह्मणाला आधीं अशी गोष्ट होतच नाहीं. झालीच तर, पंधरा दिवसां नंतर जेवणाला मोकळीक होते. प्रेत मात्र एक महिनाभर ठेऊन दुर्गंधी येऊं लागली कीं पुरून टाकतों. परंतु सहा महिनें पर्यंत दिवसा भोजन नाहीं. ज्याच्या शरिराची अशी अवस्था झाली तो पापी समजून त्याच्या तारणासाठीं ईश्वर भजन करावें लागतें. हें ऐकून हातिमास ह्या देश रिवाजाचें विलक्षण नवल वांटू लागलें. असो.

मग त्यानें रुकार देतांच एकानें प्रेतास उत्तमशा गादीवर निजवून त्याचे पुढें सुंदर सुवासीक धूप जाळून सर्वांनीं सात प्रदक्षणा घातल्या. इतक्यांत सर्वांची तयारी झाली. हातिमानें सरासरी पांचच घांस घेतले. नंतर सारे लोक यथेच्छ जेऊन उरलेलें अन्न त्यांनीं मुलाबाळांस पाठवून दिलें. नंतर स्वच्छ वस्त्रें परिधान करून पूर्वींचीं घोड्याकडे दिलीं, व मग सर्वांनीं दूर मैदानांत प्रेत नेऊन पुरलें. माघारे येतांना हातिमासही

त्यांनीं गावांत नेऊन एक उत्तमसा बंगला उतरण्यास दिला. नंतर उत्तम मेजवानी देऊन त्याचे सन्मानार्थ नृत्यगायनही करविलें. तेणेंकरून हातिमास मोठा संतोष वाटला. तो सातदिवस त्या गांवीं होता. तेव्हढ्यांत त्याचे गुणाची कीर्ति सर्वतोमुखीं झाली. ती राजाचे कानीं जातांच राजानें त्याला घरीं आणून भोजनादिकें करून फारच आदर केला. त्यांत हातिम 'कोहनीदा' अवाज करणाऱ्या पहाडाच्या शोधार्थ जात आहे असें जाणून राजा ह्मणाला, माझ्या ऐकण्यांत असें आहे कीं, 'झलमत' नांवाचें एक अरण्य असून तो सारा प्रदेश अंधःकारमय आहे, त्याचे दक्षिणेस हा पर्वत आहे. त्या पर्वता निकट नेडा नांवाचें शहर आहे व तेथील लोक अजरामर आहेत असें ह्मणतात. तें ऐकून हातिमास संतोष होऊन तो तेथून निघाला. त्यातेवेळीं राजानें त्यास बरेंच इनाम दिलें. हातिमानें कारणापुरतें द्रव्य घेऊन बाकीचें गरीबांस वांटून दिलें.

सुमारें तीन महिन्यानें त्याला एक गांव लागलें. तेथें थडगें वगैरे त्याला कोठें आढळलें नाहीं. तेव्हां तेंच नेडो शहर असेल असें समजून तो गांवांत शिरला. हा कोणी प्रवासी आहे, असें तेथील लोकांचे लक्षांत येतांच त्यानें कोण, कोठील, जाणें कोठें ह्मणून विचारलें. हातिम ह्मणाला, मला नेडो पर्वताकडे जाणें आहे. लोक ह्मणाले अरे नकोरे नको, तिकडे जाणें ह्मणजे मृत्यूचे घरीं जाणें आहे. तो ह्मणाला, माझा सर्व भरंवसा परमेश्वरावर आहे. लोक ह्मणाले मर्जी तुझी, पण आजची रात्र येथें राहून उद्यां जा. असें ह्मणून त्यानें त्यास आपले घरीं नेलें.

त्याच रात्रीं हातिमास एक विलक्षण चाल तेथें आढळली. ती अशी कीं, थोडे दिवसांपासून तेथें एक मनुष्य अजारी पडल्यापुळें तेथील लोकांनीं त्यास ठार करून त्याचे तुकडे गांवांतील बहुत्येकांस वांटून दिले. त्याप्रमाणें हातिमाच्या यजमाना-

च्याही घरीं एक तुकडा आला. त्यानें त्याचा उत्तम पाक करून या थोर पाहुण्याचे ताटांत वाढला. नंतर तो भोजन प्रसंगीं हातिमास ह्मणाला, महाराज आपण कधीं खाल्लें नाहीं असें मांस आज अनायासें माझेकडे आलें आहे. हातिम ह्मणाला माझे खाण्यांत नाहीं असें एकाही जनावराचें मांस आतां उरलें नसेल. तो ह्मणाला पशुमांस नव्हे, हें नरमांस आहे. तें ऐकतांच हातिम भयभीत होत्साता ह्मणाला, काय तुह्मी नरमांस खातां ? तुह्मी मनुष्य मांस खाणाऱ्या देवाचे भक्त तर नव्हत ? आणि असें असेल तर तुह्मी एखाद्या फिरस्त्यास बळी देण्यास चुकणार नाहींत. तो ह्मणाला आपला तर्क खरा आहे, व एखादे वेळीं आपलेवर पाळी येण्याचा संभव आहे. तें ऐकतांच तो तसाच पात्रावरून उठून घराबाहेर पडून रानोमाळ धांवत सुटला. कदाचित आपणास कोणी धरतील ह्या धास्तीनें अन्न पाण्याचीही आशा सोडून सारखा दोन अहोरात्र मार्ग चालून गेला. नंतर तिसरें दिवशीं तो एक हरीण मारून चकमकीचे योगानें विस्तव तयार करून त्याचा एक तुकडा भाजूं लागला. इतक्यांत क्षुधेनें पीडित असा एक सिंह त्याचे पुढें येऊन त्यानें याचना केल्यामुळें बाकीचें हरिण हातिमानें त्यास देऊन थोडीशीं फळें व तो तुकडा खाऊन पाणी पिऊन निघाला. पुढें त्याला रेताड मुलुख लागला. तेथें मनस्वी उष्णता असल्यानें तो क्षुधेनें व्याकुळ झाला. त्या प्रदेशांत पाणी तर नाहींच पण उलट मृगजलाचे भासानें एकवेळ त्याची बरीच धांवपळ उडाली. नंतर त्यास एक पाणकोंबडा दिसला. हे प्राणी पाण्याचे आश्रयानेंच रहातातें हें हातिमास ठाऊक असल्यामुळें धीर येऊन तपास करतां एक ओहोळ आढळला. त्या योगानें त्याची तहान भागून बरेंच समाधान झालें.

नंतर पुढें जातां जातां एके स्थळीं बहुत मनुष्यें जमली असून

प्रचंड अग्नि पेटविला आहे. हें पाहतांच तो तेथें येऊन चौक-
शी करूं लागला. तेव्हां एकानें सांगितलें, आमचा एक मनुष्य
मेला असल्यामुळें त्याची बायको त्याचे बरोबर सती गेली.
त्यांस दहन करण्यासाठीं आह्मी येथें जमलों आहोंत. हातिम
ह्मणाला, तर मग तुह्मी प्रेतें जाळतां, पुरीत नाहीं! शिवाय ए-
कासाठीं दुसऱ्याचाही जीव घेतां? ही केवढी क्रूर चाल. गृह-
स्थ ह्मणाला, तर मग ह्या देशांत तुह्मी आजच आलां वाटतें.
असो, येथें प्रेत जाळण्याची वहिवाट आहे. शिवाय पतीबरोबर
त्याची स्त्री सति जाणें हें केवळ उभयतांच्या प्रेमाचें लक्षण होय.
ह्याबद्दल कोणी तिचेवर जुलूम करीत नाहीं. ती तें स्वसंतोषानें
करते. हातिम ह्मणाला तें कांहीं असो, परंतु ही अत्यंत क्रूर
चाल खरी. ह्यानंतर हातिम तेथून चालता झाला. तो दुसरे
दिवशीं दोनप्रहरीं दुसऱ्या एका गांवीं गेला. त्यावेळीं तो अ-
त्यंत क्षुधाक्रांत झाला होता. ह्मणून एका मनुष्याजवळ त्यानें
कांहीं खाण्यास मागितलें. त्यानें सन्मानपूर्वक त्यास घरांत
नेऊन जेऊं घातलें. नंतर थोडें फार भाषण होऊन हातिमानें
ह्मटलें 'सति जाणें' ही तुमची चाल तुह्मांस क्रूरतेची वाटत
नाहीं काय? ह्या अलभ्य देहाचा नाश करणें हा कोठला धर्म?
ही परमेश्वराच्या इच्छेविरुद्ध गोष्ट होय. कांकीं, त्याच्या
देणगीची ही व्यर्थ हेळसांड होते. गृहस्थ ह्मणाला तें खरें,
पण हें केवळ प्रीतीचें लक्षण होय, त्याप्रीतीचे वियोगात जें अं-
तर पडलें तें सहन करवत नसल्यामुळें स्त्रिया आपखुषीनें सति
जातात, त्यांवर कोणी बिलकूल जुलूम करीत नाहीं. एखादेवेळीं
ह्याची प्रचीती आपले दृष्टीस पडेल. असें बोलून त्या दिवशीं
गृहस्थानें हातिमास आपले घरींच राहून घेतलें.

अनायासें दुसरेच दिवशीं तेथील एक गृहस्थ मृत्यु पावला,
त्यास चौघी बायका होत्या, व दोघींस दोन कन्या होत्या.

मग चालीप्रमाणें त्या चौघीही सती जाण्यास सिद्ध होऊन सौभाग्यालंकारांनीं मंडित होत्सात्या पतिप्रेतासह स्मशानभूमिकेकडे चालल्या. तें पाहून हातिमास खेद होऊन त्यानें त्या स्त्रियांस सती न जाण्याविषयीं पुष्कळ बोध केला; परंतु त्या स्त्रियांनीं त्यास समर्पक उत्तरें देऊन निरुत्तर केलें. नंतर स्वसंतोषेंकरून त्या पतिसह जळून गेल्या. हातिमाचे डोळ्यांतून पाण्याच्या एक सारख्या धारा वहात होत्या. इतक्यांत त्याचा मित्र तो गांवकरी ह्मणाला, कां पाहुणे स्त्रिया स्वसंतोषानें सती जातात ह्याबद्दलची खात्री झालीनां? हातिम ह्मणाला पण मला वाटतें ह्या निर्दय चालीपेक्षां पतीचे पश्चात चोखपणानें वागून प्रेमाची खात्री करावी, हेंच फार उत्तम. शिवाय तुमचे शास्त्राप्रमाणें अग्नि हा तरी परपुरुष नव्हे काय? याला तरी स्पर्श कसा करावा? गृहस्थ ह्मणाला, यद्यपि तो परपुरुष आहे तरी येथें वासना दुष्ट नसते. इत्यादि बोलतां बोलतां ते घरीं आले. नंतर दुसरे दिवशीं नेडोपर्वताकडे जाण्यास हातिमानें रजा मागितली. गृहस्थ ह्मणाला, ही गोष्ट मोठ्या धोक्याची होय. हातिम ह्मणाला परमेश्वर माझें रक्षण करण्यास समर्थ आहे. असें बोलून तेथून तो निघाला. नंतर सुमारें पंधरावे दिवशीं तो एका शहरानिकट आला. तेथेंही गांवाबाहेर बरेच लोक जमून एकमेकाशीं झगडत आहेत असें पाहून जवळ जाऊन 'कां भांडतां' ह्मणून विचारलें. तेव्हां एकजण ह्मणाला, हे सभ्यगृहस्था आज आमच्या गांवातील एक स्त्री मृत्यू पावली आहे, तेव्हां आमच्या शास्त्राप्रमाणें तिचे बरोबर तिचे पतीसही पुरावें लागतें. पण तिचा नवरा तें मान्य करीत नाहीं ह्या साठीं आह्मी वादविवाद करतों. हें ऐकून तर हातिमास फारच आश्चर्य वाटलें. त्यानें पूर्वीं प्रमाणेंच येथेंही पुष्कळ उपदेशपर गोष्टी सांगितल्या. त्या वेळीं नवरीचा बाप ह्मणाला महाराज, आपलें ह्मणणें तें क

सेंही असो. परंतु मी ह्मणतों कीं, मनुष्यानें बोलल्या प्रमाणें चाललेंच पाहिजे. पहा माझा जांवई हा पर प्रांतीचा असून ह्याचे प्रसंगीं मी त्याचे पासून अशी अट कबूल करून घेतली होती कीं, आमचे देशांतील चाली प्रमाणें जर तुझे पूर्वी तुझी बायको मृत झाली तर तुला तिचे बरोबर आह्मी पुरून टाकूं. हें ह्मणणें त्यानें चौघा लोकांत कबूल केलें. आतां असा भयंकर प्रसंग येऊं नये, परंतु आला. तर ह्यानें आपलें वचन पाळलेंच पाहिजे. हें ऐकतांच हातिम चूप बसला. इतकेंच नाहीं तर उलट त्या मृतस्त्रीचे पतीस त्यानें स्पष्ट सांगितलें कीं, बाबारे आवां मात्र तुला नानू करतांकामा नये, आतां तुला आपलें वचन पाळलेंच पाहिजे. जीव तर सर्वांस प्यारा आहेच पण त्याहून सत्य भाषण हें प्रीय मानलें पाहिजे. अपकीर्ती ही मरणापेक्षांही नीच आहे. तें ऐकून तो गृहस्थ निराश होऊन ह्मणाला तुह्मी माझ्या विरुद्ध झालांना ? पण मी तर चक्क सांगतों कीं, मी आतां हत्या करण्यास खुषी नाहीं, असें पाहून हातिमानें त्यास दूर एकांतीं नेऊन ह्मटलें गड्या, तुला स्त्रीसमवेत थडग्यांत गेल्यावांचून आतां उपाय नाहीं. परंतु मी तुला एक वचन देतों कीं, तूं समाधी तर घेच पण मग मी तेथून तुझी सुटका करीन. तूं ह्मणशील कीं, सुटका होई पर्यंत प्राण राहील कसा तर त्याला मीं अशी युक्ति करतों कीं, समाधीचे आंत हवा यावी अशी योजना करण्याची आमचे प्रांतीं चाल आहे. ती मान्य होत असल्यास समाधी घेण्यास मी तयार आहें' असें तूं ह्मण ह्मणजे मी त्या प्रमाणें व्यवस्था करून तुझी सुटका करीन. असें होईलच अशी जरी त्या गृहस्थास खात्री वाटेना तरी केवळ ईश्वरावर भरंवसा ठेऊन त्यानें तें पत्करलें. नंतर लागलेंच हातीमानें लोकांस मृत स्त्री पतीचा देशरिवाज सांगितला. नंतर असें करण्यासाठीं त्या लोकांनीं तेथील अभि-

कान्याची परवानगी घेऊन हातिमाचे युक्ति प्रमाणें थडग्याची व्यवस्था लावून सर्व जिकडल्या तिकडे झालें. थडग्याचे आंत अन्न पाणी ह्यांची सोय केली असून हवा होती त्यामुळें आं तील जिवंत मनुष्यास थोडासा दम आला.

हातिम तेथें होता इतक्या वेळांत त्याची व एका गांवकऱ्याची बरीच सलगी होऊन त्यानें त्याला आपले घरीं नेलें. नंतर आदरयुक्त हातिमाशीं वागून भोजनोत्तर त्याच्या शय्यागाराची यथायोग्य तजवीज लावून दिली. नंतर चोहींकडे सामसूम होतांच हातीम आपलें वचन पुरें करण्यासाठीं थडग्या जवळ आला. परंतु मृत स्त्रीचीं माणसें तेथें भजन करीत असलेलीं पाहून त्याला फारच वाईट वाटलें. मृताच्या थडग्याजवळ तीन रात्र ईश्वर भजन करावें अशी तेथें चाल असल्यामुळें, बहुधा तो मनुष्य जिवंत राहणें कठीण असें हातिमास वाटून वचनभंग होत असल्यामुळें अगदीं चैन पडेनासें झालें. शेवटीं तो चौथे रात्रीं थडग्याजवळ जाऊन छिद्रांतून हांका मारूं लागला. बिचारा आंतील गृहस्थ हातिमानें आपणास पुरतें ठकाविलें असें समजून जळफळत पडला. ह्यावेळीं त्याचा प्राण अगदीं कंठगत होऊन गेला होता. हातिमाची हांक त्याला कळलीही नाहीं. तेव्हां हा मेला अशा कल्पनेनें हातीम अत्यंत खेदयुक्त झाला. तरी पुन्हां कांहीं कल्पना आल्यावरून मोठ्यानें हांका मारूं लागला. ती आंतील गृहस्थाचे कानीं पडून त्यानें कण्हत कण्हत उत्तर दिलें. तेव्हां त्यानें हातिमास धीर येऊन त्यानें आंतील मनुष्य बाहेर येईल येव्हढें थडग्यास भोंक पाडून त्यागृहस्थास बाहेर काढलें. नंतर थोडीशी मोकळी हवा लागतांच त्यास अमळ ताकद आली असें पाहून हातिम म्हणाला—गड्या आतां आधीं रस्ता धर, नाहीं तर आपले दोघांचाही हे लोक चेंदामेंदा करतील. इत-

बोलून त्यानें मागितल्यावरून हातिमानें जवळच्या कांहीं मोहरा देऊन त्यास वाटेस लाविलें. नंतर थडग्याचा नीट बंदोबस्त करून स्वारी आपले मकाणावर येऊन पोंचली. मग दुसरें दिवशीं ' नेडो ' पर्वताकडे जाण्यास त्यानें रजा घेतली. तो गृहस्थ ह्मणाला तूं मोठा माहात्मा पुरुष दिसतोस, असो तो पर्वत येथून तीस दिवसांचे वाटेवर आहे. तेथें जवळ नैडा नांवाचें एक शहर आहे. तेथें गेल्यावर पर्वतासंबंधी कच्ची माहिती लागेल. येथून सुमारें दहादिवस पर्यंत तुह्मांस सारखा रस्ता लागून पुढें दोन रस्ते होतील. त्यांतून उजवे रस्त्यानें जा ह्मणजे इष्ट स्थळीं जाल. इतकें बोलून त्यानें हातीमास गांवा बाहेर बोळवलें.

हातिम दहा दिवस सारखा एकाच रस्त्यानें चालून रस्ता फुटतांच चुकीनें डाव्या बाजूचे रस्त्यानें चालता झाला. तो मार्ग अत्यंत भयंकर, तेथें हिंस्र पशूंचे कळपच्या कळप हिंडत असत. हातिम हा राजपुरुष असल्यामुळें धनुष्यबाण तरवार इत्यादि आयुधें त्याचेजवळ होतीं. तीं त्यानें नीट नेटकीं सांवरलीं. इतक्यांत एक फार प्रचंड व भयंकर जनावर ब्रह्मांड गर्जेल अशा प्रकारची गर्जना करीत येत असल्यामुळें त्याचे धाकानें व्याघ्रादि भयंकर पशूही प्राणभयानें भयप्रद शब्द करीत सैरावैरा धांवत सुटले. हा एकाएकीं कोलाहल कशानें झाला हें पाहण्यासाठीं हातिम एका उंच वृक्षावर चढला. पाहतो तों ज्याचा आकार फारच भयंकर, डोळे लाल भडक, शेंपूट वळसा घेऊन पाठीवरून तोंडापर्यंत आलें आहे, असें सिंहापेक्षांही महा उग्र जनावर धांवत आहे असें हातिमानें पाहिलें. इतक्यांत त्या जनावराची दृष्टीही हातिमावर आली. तें पाहून हातीमानें आपली तरवार सरसावली, व तें झाडावर चढूं लागल्यास त्यास घायाळ करूं अशा बेतानें तयारी करून बसला

इतक्यांत त्या जनावरानें येऊन शेपटीचा विळखा घालून झाड खालीं पाडलें; व हातिमाच्या अंगावर उडी मारली. हातिमानें तरवार धरली होती, ती पटकन त्याचे पोटांत खुपसून तें कासावीस होऊन पडलें. काळजांतच तरवार खुपसली गेल्यामुळें थोड्याच अवकाशांत तें तरफड करून प्राणास मुकलें. तरी दहावीस तरवारीचे घाव त्याला लागलेच. मग अद्भुत व अश्रुत असें हें जनावर जें आपण मारलें त्याची उगाच खूण झणून त्याचे पंख, दांत व शेपटीचा गोंडा येवढीं तोडून जवळ घेऊन हातिम मार्गस्थ झाला. पुढें कांहींका दिवसांनीं तो एका नगरांत गेला, पण तेथें भर दिवसा जिकडे तिकडे अगदीं सामसूम. मालानीं भरलेल्या अनेक प्रकारच्या वखारी, मोठमोठ्या हवेल्या, पण चमत्कार हा कीं, तेथें हातिमास शपथेस देखील मनुष्य आढळेना! तो सर्व गांवभर हिंडत एका किल्यासारख्या प्रचंड हवेली नजीक गेला. वस्तुतः तो राजवाडाच होता व आंत राजा सहपरिवार लपून राहिला होता. त्यानें जाळींतून हातिमास पाहतांच चाकराकडून आंत बोलावून घेतलें. नंतर आदर सत्कार होऊन कोण कोठील वगैरे राजानें विचारलें. तेव्हां नैदा पर्वताकडे जात आहें असे हातिमाचे शब्द ऐकून राजा ह्मणाला तर आपण मार्ग चुकून ह्या भयंकर मार्गास लागलां. परंतु येथपर्यंत जिवंत आला हें मोठेंच भाग्य! हातिम ह्मणाला केवळ ईश्वराची कृपा असो. पण आपण दारें लावून गुपचूप बसलां, व गांवांत मनुष्याचें वारेंही नाहीं. हा आहे काय प्रकार!

राजा ह्मणाला प्रकार काय आहे हा तर तुह्मीं पाहिलाच आहे. हें दाट वस्तीचें शहर असलें पाहिजे. असें असतां दिसतो आहे हा प्रकार कां ह्याचें कारण इतकेंच, आमच्या ह्या रानांत एक फारच विलक्षण जनावर माजलें आहे, तें कसें येतें

व जातें कसें ह्याची बिलकूल चाहूल कळत नाहीं. एकदां आलें कीं, झपाट्यासरसें सहज शेंपन्नास मनुष्यांचा प्राण घेऊन जातें, पण कांहींच सुगावा लागत नाहीं. माझी सारी प्रजा अगदीं पिसाळून गेली, माझ्या मोठमोठ्या लढाऊ लोकांसही तें दाद देईना। शेवटीं एकूनएक मनुष्यें नाहींशीं झालीं तरी असून तें जनावर गांवांत शिरून ह्या वाड्याच्या तटावर चढून आंत येण्याचा प्रयत्न करतेंच. हातिम हंसून ह्मणाला आतां तुह्मी निश्चिंत असा, असें बोलून त्यानें मार्गांतील कच्ची हकीकत सांगून खुणेसाठीं पंजे, शेंपूट वगैरे जें त्यानें त्या जनावराचें घेतलें होतें, तें दाखविलें. तेणेंकरून राजास जो आनंद झाला त्याचें वर्णनही करवत नाहीं. त्यानें चोंहीकडे दास पाठवून आपली प्रजा गोळा केली. आणि हातिमास आपलें राज्य व कन्या यांचा स्वीकार करण्याची विनंती केली. मग हातिमानें अगत्याचे कामाची नड दाखवून रजा मागितली. तेव्हां राजानें सेवक बरोबर देऊन चुकलेल्या रस्त्यापर्यंत हातीमास पोंचविलें.

नंतर थोड्याच दिवसांनीं तो एका शहरीं गेला. हा राजचिन्हयुक्त पुरुष पाहतांच तेथील लोकांनीं त्यास राजाकडेस प्रविष्ट केलें, राजानें त्याचा यथायोग्य सन्मान करून ह्मटलें. बहुत दिवसांपूर्वीं आमच्या ह्या नगरांत एक परदेशी प्रवासी आला होता, त्यावर हे आपणच आलां. हातिमानें त्यास थोडक्यांत बानू वगैरे संबंधाचा मजकूर सांगितला. तेव्हां राजा ह्मणाला एकूण आपण नेढा पर्वताचे खबरीस आलां आहांत. पण तें तोंडानें सांगून त्याची समजूत होणार नाहीं. कांहीं येथें सहा महिने घालवाल तर माहितगारी होईल. हातिमानें तें मान्य करतांच राजानें त्याच्या इतमानानुरूप व्यवस्था केली.

हातिम स्वभावता मनुष्यलोभी असून दुसऱ्याचें चित्त आपले ठायीं जडवून घेण्यांत मोठा वाकब असल्यानें त्याला थो-

त्याच वेळांत बहुत मित्र मिळाले. एके वेळीं त्यानें नैदा पर्वत कोठें आहे अशी मंडळींत गोष्ट काढली. तेव्हां एकजण ह्मणाला, हा पहा तो समोरच आहे. त्याचींच तीं शिखरें आकाशमंडळास भेदून गेलीं आहेत. इतकें तो बोलत आहे तोंच कानठाळ्या बसतील असा प्रचंड ध्वनि त्या पर्वता मधून निघाला. त्यांत 'कोहनीदा' अशीं स्पष्ट अक्षरें उच्चारलीं गेलीं. तो ध्वनि होतांच जिकडे तिकडे स्तब्ध होऊन त्यांतीलच एक गृहस्थ अगदीं तटस्थ होऊन पर्वताचा रोंख धरून धांवूं लागला. त्याला कितीएक मंडळींनें पुष्कळ ओढून धरलें तरी तो त्यांना हिसका देऊन निघून गेला. काळाचीच त्याला ओढ बसली. त्यावेळीं हातिम अगदींच गोंधळून हें काय ह्मणून ज्याला त्याला विचारूं लागला. ते लोक ह्मणाले, तें आह्मांस माहीत नाहीं. त्या जाणाऱ्यामनुष्यास विचारा. हातिमानें तत्काळ त्यास धरून हा प्रश्न केला. परंतु तो उत्तर न देतां तसाच हात झटकून गेला. नंतर थोड्याच अवकाशांत पर्वत वगैरे तेथें कांहीं न दिसतां फक्त रंगीबेरंगी एक विस्तीर्ण धोंडा मात्र दिसूं लागला. तें पाहून विस्मित होत्साता हातिम मागें आला. त्यावेळीं त्याचे मित्र पर्वताकडे तोंडें करून कांहीं संस्कार करीत होते. नंतर कांहींएक न बोलतां सर्व आपापले घरीं गेले दुसरे दिवशीं मृताचे आप्तांनीं शोक न करितां गांवकऱ्यांस मोठी जेवणावळ दिली, तें पाहून हातिमास फारच शोक झाला. तेव्हां लोक ह्मणाले छी हो रडूं नका, मृताबद्दल शोक करणें हा येथें मोठा गुन्हा मानला जातो. आपण परदेशी, आपणांस आमचा कायदा माहीत नाहीं सबब एक वेळ आपणांस माफी आहे. तें ऐकून हातीम उगाच राहिला. तो तेथें सहा महिने राहिला. येवढ्यावेळांत असे प्रसंग दहा बारा वेळ होऊन गेले. हातिमानें शोध काढण्यांत कमी केलें नाहीं. परंतु त्यास

समाधान वाटण्यासारखा जबाब कोणीच दिला नाहीं.

एकवेळ तो यूसफ नांवाच्या एका गृहस्थासह भाषण करीत असतां एकाएकीं पर्वतापासून पूर्ववत ध्वनि होऊन तो यूसफ स्तब्ध होऊन झरकन पर्वताकडे निघाला. त्यावेळीं आतां स्वतांच साहस केल्यावांचून ही गोष्ट आपणास कळावयाची नाहीं, असा निर्धार करून तो यूसफाचे मागोमाग धांवला. यूसफाचे आप्त त्याला पोंचवण्यास आले होते. हातिमानें त्याचे हाताला घट्ट धरून ह्मटलें अरे मित्रा, तूं जातोस कोठें तें सांगतर खरें, मी प्राणाची आशा सोडून तुझे बरोबर येत आहें. इत्यादि बरेंच बोलला, परंतु यूसफ एक अक्षरही त्याशीं न बोलतां, हात हिसकून त्यास पाडून पुढें चालता झाला. ह्यावेळीं त्याचें अंग अगदीं थंडगार पडत चाललें होतें. हातिमानें जल्दी करून त्यास पुन्हां पकडून धरलें. नंतर ते दोघेही हत पर्वताचे मध्यापर्यंत चढले, तोंच तेथें पर्वत उकलून दोघे आंत घुसले. यूसफ बरोबर हातिम गेला, हें राजास कळतांच त्यानें यूसफच्या आप्तांवर खूप ठपका दिला, असो. हे दोघे पर्वतांतून पुढें गेल्यावर त्यांना हिरवेंचार मैदान लागलें. तेथून काळेंभोर मैदान लागलें. तेथें कबरे सारखा एक धोंडा होता, त्यावर यूसफ उताणा पडला. तोंच त्याचा प्राण जाऊन तो तेथें जमीनीचे पोटांत शिरला. नंतर तेंही मैदान हिरवेंचार दिसूं लागलें. हा विलक्षण प्रकार पाहून हातिम विचार रहित होऊन मागें फिरला. तेव्हां त्याला चोहींकडे सपाट मैदान दिसूं लागलें. परत येण्याचा मार्ग माहीत नसल्यामुळें तो सातदिवस तेथें हिंडला. त्याला चिटपाखरूंही तेथें आढळलें नाहीं. हिंडतां हिंडता समुद्राची गर्जना त्याचे कानीं येऊन तो हुशारी धरून समुद्रतीरीं गेला. किंचितवेळानें तेथें एकाएकीं एक गलबत आलें. तेणेंकरून हातिमास आनंद होऊन तो त्यावर च-

डला. ह्यावेळीं परमेश्वराचे त्यानें फारफार आभार मानिले. असो. परंतु गलबतांत दुसरें कोणी मनुष्य नसल्यानें तो फारच चकीत झाला. तो त्यांत हिंडत असतां एका ताटांत दोन भाकरी व थोडीशी भाजी त्याला दिसली. परंतु कदाचीत गलबतावरच्या नाखव्यानेंच हें अन्न येथें ठेऊन तो आसपास कांहीं कामासाठीं गेला असावा; अशा कल्पनेनें तो तेथेंच क्षणमात्र पडून राहिला. इतक्यात तेथें एक जलदेवता उत्पन्न होऊन ह्मणाली हातिमा, हें तुझ्यासाठींच अन्न ठेवलें आहे तें तूं घे. इतकें बोलून ती गुप्त झाली. तेव्हां हातिमानें परमेश्वराचें सद्गदित अंतःकरणानें स्मरण करून तें अन्न खाल्लें. व तेथेंच सुंदर पाण्याचें मांडेंही होतें त्यांतील पाणी पिऊन शांत झाला. नंतर शीड सोडून त्यानें गलबत हाकारलें. त्याचा हेतू असा होता कीं, नैडाशहरीं जाऊन यूसफचें वर्तमान सर्वांस कळवावें. परंतु रस्त्याच्या गैरमाहितीमुळें वारा नेईल तिकडेच जात चालला. सहा दिवस तर त्याला वर आकाश व खालीं जमीन त्यावांचून कांहीं आढळलें नाहीं. पुढें एक प्रचंड पर्वत दिसला. तेथपर्यंत जाण्यास त्याला तीन दिवस लागले. तों त्या पर्वतावर चढतांना रक्ताचे प्रवाह त्याचे दृष्टीस पडूं लागले. मग दगडांतून रक्तप्रवाह वाहण्याचें कारण कसें कळेल ह्या चिंतेनें तो सर्व पर्वत चढून गेला. तेथें त्यास प्रचंड मैदान लागलें. सर्व भूमि व पांखरें हिरव्या रंगाची, असा अद्भुत चमत्कार पाहत तो चारकोस गेला. पुढें ज्याचें पाणी रक्तासारखें लाल असा समुद्र त्याला आढळला. त्याचे किनाऱ्यानें तो एक महीनाभर हिंडला. कांहीं पांखरूं, सावज वगैरे मारून क्षुधा शांत करावी, व आस्वल कन्येच्या मोत्यानें तृषा शांत करावी. पुढें जांभळ्या रंगाचा समुद्र लागला. तेथें पांखरूं बिलकूलच आढळेना, त्यामुळें क्षुधेनें पिच परमेश्वरावर भरंवसा ठेऊन पुढें चालला तेव्हां किरमिजी

रंगाचा समुद्र आढळला. असें पाहून बहुधा आतां ह्या प्रांतांतून पुन्हां मनुष्यवस्तींत जाऊं असें त्याला वाटेना. त्याला स्वतापेक्षां मुनीरशहास दिलेल्या वचनभंगाचाच भारी खेद झाला. तो याबद्दल खेद करीत आहे तोंच एक छोटेंसें तारूं आपलेकडे येत आहे असें पाहून त्याला मोठा हर्ष झाला. मग तारूं येतांच परमेश्वर स्तवन करून वर चढला. तेथें पर्वत कोणी मनुष्य नसून दोन भाकरी व भाजी त्याला आढळली. मग हा जलदेवीचा प्रसाद समजून त्यानें तें ग्रहण करून टाकलें, आणि लागलेंच गलबत हांकरून निघाला. थोड्याच अवकाशांत त्यास जमीन लागली. ही किरमिजी रंगाचीच असून तेथून रक्ताचे ओहोळ वाहत होते. पुढें जसजसा तो पुढें चालला तसतशी निःशेष तेजयुक्त जमीन तेथून शेवटीं रौप्यवर्ण लाटांनीं युक्त असा प्रचंड सागर आढळला. त्यावेळीं ईश्वरकरणीचें आगाध वर्णन मनांत आणून चमत्कारार्थ समुद्राचे पाण्यांत त्यानें आपला हात बुडविला. तोंच त्याची रुप्यासारखी कांती दिसूं लागली. ह्याबद्दल त्याला भारी वाईट वाटलें. इतक्यांत त्यावेळीं त्याचेकडे एक गलबत आलें. तेव्हां परमेश्वरी लीलेचें कौतुक मानून व स्तोत्रें गाऊन गलबतांत बसला. त्या गलबतांत अनेक सुंदर खाण्याचे पदार्थ व मधुर पाणी त्याला यथेच्छ प्राप्त होऊन तो पोटभर जेवला. नंतर गलबत हांकारून चालला असतां अकरावे दिवशीं पर्वत लागला. तो सारा चांदीचा होता. त्याचे शिखरावर चढून पाहतो तों तेथून बऱ्याच अंतरावर दुसरें एक फारच तेजोमय शिखर दिसूं लागलें. त्यावर चढतांना तेथील चित्रविचित्र रंगाचीं पाखरें पाहून तो निर्वाह करी. त्याचा रौप्ययुक्त बनलेला हात अगदीं जड होऊन कुच कामाचा झाला होता. दुसऱ्या जडपणानें त्याला खेद मात्र फार होई. असो. मग दोन चार

दिवस तेथून मार्ग क्रमीत असतांना नाना रंगाचे अत्यंत तेजस्वी खडे त्याला दिसूं लागले. त्या खड्याचे ठायीं सूर्यतेज प्रविष्ट होऊन प्रकाशकिरणांच्या वक्रीभवनानें एक विलक्षणच शोभा दिसत होती. हीं अशीं परमेश्वरी कृत्यें पाहून तो अगदीं ईश्वरीशक्तीबद्दल विचारशून्य होऊन गेला. पुढें निरखून पाहतांना ते खडे नसून मौल्यवान हिरे आहेत अशी त्याची खात्री होऊन त्यांतून चांगले चांगले कांहीं खडे त्यानें जवळ घेतले. परंतु तो जसजसा पुढें जाई तसतसे पूर्वीपेक्षां अधिक अधिक मौल्यवान हिरे त्याचे दृष्टी पडत. तेव्हां गोळा केलेले टाकावेत, पुन्हां दुसरे घ्यावेत असे वारंवार प्रसंग पडत गेले. हें असलें जवाहीर एकाही राजाच्या संग्रहीं नसेल असें त्यास वाटलें. असो. मग तो एकावरून दुसऱ्या पर्वतावर, दुसऱ्यावरून तिसऱ्यावर असे बरेच पर्वत ओलांडून एका ओढ्याजवळ गेला. त्यांतील पाणी पीत असतां त्याच्या हाताची रोप्यकांती चटकन नाहींशी होऊन तो पूर्ववत झाला. त्यावेळेस त्यानें फारच सद्गदीत होऊन ईश्वर स्तवन केलें. व विश्रांतीस्तव वृक्षछायेंत निद्रिस्त झाला.

नंतर जागृत होऊन पाहतो तों ओढ्याचे पैलतीरीं ज्यांचे हात पाय सिंहासारखे व तोंडें मनुष्यासारखीं असे नरसिंहरूपवत् मिश्ररूपी पुरुष त्याचे दृष्टी पडले. हे कोणी दुष्ट असावेत अशा कल्पनेनें हातिमानें धनुष्य सजवून एक बाण त्यांनां मारला. तो त्यांना लागला नाहीं. तरी ते संतापून ह्मणाले, हातिमा काय हें? विनापराधी आह्मांस तूं कां मारूं इच्छितोस? आपण सर्व एकाच परमेश्वराचे प्राणी आहोंत. हातिम हा दयेचा सागर असल्यामुळें ते शब्द त्याच्या काळजाला झोंबले. त्यानें धनुष्य खालीं टाकून ह्या अयोग्य कर्माबद्दल खूप पश्चाताप चालविला. हें पाहून ते दोघेही अलीकडे येऊं लागले.

ह्या अशा विचित्र पुतळ्यांचें सान्निध्य हातिमास अमळ भयप्रद वाटूं लागलें. इतक्यांत ते जवळ येऊन ह्मणाले, हातिमा तूं मोठा उदार, परदुःख दुःखीत अशी तुझी त्रिभुवनांत कीर्ति गाजते, तुझा कित्ता हवा त्यांनीं घ्यावा असा तूं अद्वितीय मनुष्यप्राणी आहेस. असो. असें असून तूं येथील रत्नें कां बरें घेतलींस? अशा लोभीपणानें तुझें येथून कधींच घरीं जाणें होणार नाहीं. तो ह्मणाला तें सारें खरें, पण मी कांहीं दुसऱ्याचें द्रव्य हरण करीत नाहींत. ते ह्मणाले ह्मणजे? हें द्रव्य निवारसी समजतोस कां? येथील रहिवासी हेच त्याचे मालक होत. हातीम ह्मणाला, ईश्वरानें सर्व प्राण्यांत मनुष्यप्राणी हाच श्रेष्ठ उत्पन्न केला आहे. आणि ह्याच कारणानें सर्व सृष्टपदार्थांचा तोच धनी आहे. तेव्हां ह्यांत माझा गुन्हा नाहीं. शिवाय मी तरी फारशी रत्नें घेतलीं नसून तींही कोणाला तरी मी देऊनच टाकणार. प्रचंड सागरांतून ओंजळभर पाणी घेतलें असतां त्याचें जसें कमी होत नाहीं, तद्वतच येवढ्या या रत्नमय प्रदेशांतून हीं येव्हढींशीं रत्नें घेतलीं ह्मणून कमी होणार नाहींत. ते ह्मणाले तें सारें खरें, तरी ह्यावर लोभ धरूं नयेस हें तुझ्या फारच हितावर पडेल. तें ऐकतांच हातिमानें सारीं रत्नें फेंकून दिलीं. व येवढें ह्मणाला कीं, तर मग मी उगाच येव्हढा वेळ हें ओझें वाहिलें. तें ऐकून त्यांनीं फारच उत्तम अशी रंगारंगाचीं तीन रत्नें त्याला दिलीं. आणि ह्मणाले ह्यापेक्षां जास्त येथील वस्तूंचा तूं लोभ धरलास तर तुझी अपकीर्ति होईल. हातिम ह्मणाला, तुमचें भाषण मी पक्कें लक्षांत ठेवतों. मात्र मला नीट रस्ता दाखवा. ते ह्मणाले संकटकाळीं परमेश्वर तुझें साहाय्य करीतच आहे, तोच तुला रस्ता दाखवील. आजवर कैक लोक येथें येऊन प्राणास मुकले. परत गेले असे तीनच. तुझें आयुष्य मोठें आहे, ह्मणून तूं जगलास. असो. तुला येथून सुवर्ण सागर

लागेल पुढें, व पुढें तांबडा लागेल. परमेश्वर तुझा रस्ता देतच आहे. तांबड्या सागरा नंतर तूं नीटच इमन देशीं पोंचशील. येथच्या वस्तूवर लोभ ठेवूं नको हें पक्कें ध्यानांत ठेव. इतकें बोलून ते गुप्त झाले. नंतर हातिमही परमेश्वर स्तवन करून मग चालता झाला. चवथे दिवशीं त्यास एक नदी लागली. तेथें फारच उत्तम मोत्यें त्याचे दृष्टीस पडलीं. आतां हात लावणार तोंच त्याला त्या नरसिंहाकृति प्राण्यांच्या बोलण्याची आठवण होऊन त्यानें येव्हढीं अमोल मोत्यें तृणवत मानलीं. नंतर पाणी पिऊन शांत होऊन आपल्या मार्गास लागला.

कांहीं दिवसांनीं त्याला जिकडे तिकडे चकचकीत तेजस्वी पिंवळा रंग दिसूं लागला. तेणेंकरून कदाचित जवळपास कोठेंतरी सुवर्णपर्वत ह्मणतात तो असावा. ( हिंदूशास्त्रांत मेरु हा सुवर्ण पर्वत आहे असें प्रसिद्ध आहे ) तेव्हां हा एक दर्शनाचा फारच उत्तम लाभ प्राप्त झाला असें मानून तो मोठ्या हर्षानें चालून एक महिन्यांत त्या पर्वताच्या तळाशीं गेला. तेथें जिकडे तिकडे पिंवळेंच पिंवळें. वृक्ष, त्यांचीं फुलें, त्यांचीं फळें, भूमी, दगड, उदकप्रवाह सारें पिवळें धमक. सूर्यांचा त्या पर्वतावर प्रकाश पडून अंतरिक्षप्रदेशीं चकचकीत पिंवळटी येऊन गेली होती. हा अलौकिक देखावा पाहत पाहत तो तिसरे दिवशीं [illegible] सपाटीवर गेला. तेथें एक फारच रमणीय बाग [illegible] शिरून तो एका सुवर्ण शिळातळावर विश्रांतिस्तव बसला; तोंच त्याला गाढ निद्रा लागून गेली.

हातिम सारी रात्र तेथेंच होता. सुमारें प्रहर रात्रीनंतर तेथें [illegible] गंधर्वकन्या आल्या. त्यामध्यें एकीचें रूप अलौकिक होतें. त्यांपैकीं प्रथम कांहींजणी हातिम होता तेथें आल्या. त्यांनां पाहतांच आपण निर्जनस्थळीं नाहीं हें जाणून हातिमास मोठा हर्ष झाला. त्यानें त्यांचा शोधही केला. त्या ह्या

ल्या, या प्रदेशाची मालकी एका गंधर्वाकडे आहे, त्याच्या कन्येच्या दासी आहोंत. ती गंधर्वराजकन्या येथें रहावयास येत असल्यामुळें आह्मी येथें आलों. तीही आतांच येथें येई ल. इतक्यांत कमल, चंद्र, रतिमदन, मेरु इत्यादि अनेक सुंदर वस्तूंचें सार काढूनच जिची मूर्ति ओतली आहे, अशी ती स्पृहणीयरूपा गंधर्वराजकन्या तेथें आली. जिला पाहतांच योग्याचे योग लटपटतील असें तें ठेंगणें ठुसकें व जीचे शरीरापासून भ्रमरा सारखा आमोद चालला आहे, जिचे कांतीनें आस्मंत प्रदेश तेजोमय होऊन गेला आहे अशी अद्वितीय सुंदरी हातिमाच्या दृष्टीपथांत येतांच तो कामशरानें विव्हळ होऊन भूतलावर निचेष्ट पडला. ती गंधर्वराजकन्या मोठी चतुर होती. हातिमाची स्थिति सकारण तिचे मनांत उतरली. तिनें [illegible]र सुगंधी उदक शिंपून वारा घालून त्यास सावध केलें व आपण तेथें जवळच बसली. नंतर तिनें ' आपण कोण वगैरे ' हातिमास विचारलें. हातिमानें कारणिक मजकूर तिला कळवून तिचाही वृत्तांत विचारला. ती ह्मणाली, मी येथील अधिपति जो गंधर्व त्याची कन्या होय. मी दरसाल वसंतऋतूचे आरंभीं ह्या उद्यानांत रहावयास येऊन पर्जन्यकाळास आरंभ होतांच राजधानीकडे जातें. ह्याला ' स्वर्णगिरी ' असें ह्मणतात. असो. इतकें झाल्यावर तिनें त्यास आपले महालांत नेलें. पांच दिवस तिनें त्यास तेथें ठेऊन घेऊन त्याचा उत्तम सत्कार केला. नंतर तो तिची रजा घेऊन तेथून निघाला. पर्वतावरून जमीनीवर येण्यास त्याला तीन दिवस लागले. नंतर एक महिना प्रवास केल्यावर तो सुवर्ण सागराजवळ गेला. मेघमंडळास पोंचतील अशा त्याच्या लाटा उसळत होत्या. तेथील रेती सुवर्णमय होती. ह्या अशा अद्भुत दर्शनापासून हातिमास वारंवार ईश्वरी अगाध चातुर्याबद्दल विस्मय होत असे. तो ईश्वरी शक्तीच्या अगाध

लीलेबद्दल लक्ष पोंचवीत आहे तोंच तेथें एक गलबत आलें. त्यांत बसून तेथील पदार्थ खावून स्वारी चालती झाली. त्यास पाणी मात्र तेथें मिळालें नाहीं. सागराचें पाणी प्यावें तर न जाणों सोन्याचा हात होईल ह्या धास्तीनें त्याला बराच वेळ तहानेची पीडा सोसावी लागली. पुढें गलबतांतच त्याला एक भांडें सांपडून तो तेणेंकरून समुद्रांतील पाणी घेऊन तृषा शमन करता झाला.

हातिम सुमारें दोन महिनें त्या समुद्रांतच होता. भूकेचेवेळीं त्याला नित्य अन्न प्राप्त होत असे. पुढें त्यास रेतिमय प्रदेश लागला. तो दिवसा सपाटून तापलेला असल्यामुळें उष्णतेचे योगानें हातिमाची भारी दुर्दशा उडाली. तो निस्वाळस तेथें होरपळूं लागला व बहुधा प्राणांतच होतो असें त्यास वाटलें. इतक्यांत पूर्वींचे ते नरसिंहाकृति त्याला भेटून त्यानें त्यास एक भारलेलें मोतीं हातीं देऊन ह्मटलें कीं, तूं हें मुखांत धर, ह्मणजे ह्या प्रदेशांतून निभावशील. एकदां हा अग्निप्रदेश व तसाच अग्निसमुद्र ह्यांतून पार पडलास कीं हें समुद्रांत झोंकून दे. असें बोलून ते अदृश्य झाले. पुढें हातिमास त्या मोत्याच्या योगानें कांहींच वाटलें नाहीं. मग त्याला अग्निसमुद्र लागला. तेथें लाटा ह्मणजे शुद्ध ज्वाळांचे लोट उसळत. तें पाहून हातिमाचे पाय गळूनच गेले. तरी इतक्यांत एक मोठेसें तारूं तेथें प्राप्त होऊन तो त्यांत बसून चालता झाला. कांहीं दिवसांनीं त्यासमुद्रांत भयंकर तुफान होऊन तें तारूं चक्रासारखें गिरके खाऊं लागलें. फारच भयंकर तो प्रसंग. त्यावेळीं तो ईश्वराकडे लक्ष लावून स्वस्थ पडून राहिला. शेवटी लाटांच्या प्रचंड वेगानें ते तारू ऐका खडकावर आदळून त्याचे तुकडे झाले. आणि हातिम हेलकावे खातखात तिसरे दिवशीं एका सपाट्या लाटेच्या धक्यानें जमीनीवर येऊन पडला. नंतर सावध होऊन

पाहतो तों सुंदर सुपीक अशा भूप्रदेशीं ईश्वरानें आपणास आणून टाकलें असें वाटून त्यानें प्रथम तें मोतीं समुद्रांत झोंकून देऊन ईश्वराचीं स्तोत्रें गावून मार्गक्रमण आरंभिलें.

नंतर कांहीं कालानें तो तहत इमन प्रांतातच जाऊन पोंचला. नंतर एका शेतांत एक शेतकरी काम करित होता त्यास ह्मणाला, कायरे गड्या ह्यादेशाचें नांव काय बरें ? कोण येथचा राजा? शेतकऱ्यानें ह्यास पहातांच ओळखलें. ह्मणून तो प्रथम कांहींच बोलेना. तरी पुन्हां हातिमानें विचारल्यावरून तो ह्मणाला. महाराज ह्याला इमनदेश ह्मणतात, येथचा राजा ताईनामा होय. त्याचा मुलगा आज सातवर्षें परोपकारार्थ एकाचें कांहीं काम करून हिंडत आहे. एकवेळ त्यानें आपल्या बायको बरोबर खुशालीचें पत्र बापास रवाना केलें होतें. ते राजपुत्र बहुधा आपण असावेत अशी माझी मनोदेवता मला सांगते. मग हातिमानें ती गोष्ट मान्य करून त्याचे झोंपडींत जाऊन त्यानें देलेल्या भाकरी खाऊन पाणी पिऊन शांत होऊन ह्मणाला. शेतकरीदादा मी आपल्यास भेटल्याचें वर्तमान राजास सांगून इतकें कळवाकीं, ज्याचें मी काम पतकरलें तें आतां थोडेंच उरलें आहे तें आटपलें कीं घरीं येऊन पुन्हां कधीं प्रवासास जाणार नाहीं. तूर्त भेट घेण्यास अवकाश नाहीं. इतकें बोलून तो तेथून निघून शहाबादेस गेला. आपला मित्र व बानू ह्यांची गांठ घेऊन सकळ वर्तमान कळवून व जवळ आणलेलीं तीन रत्नें तिला देऊन तिची सहावी अट जी ' पाणकोंबड्याच्या अंड्या येवढें मोतीं एक तिचे जवळ आहे तसें दुसरें आणावयाचें ' ह्यासाठीं पूर्वींचें मोती पाहून त्याबरहुकुम एक चांदीचा नमुना करून घेऊन हातीम सहाव्यानें पर्यटनास निघाला.

# सवाल सहावा.

## पाणकोंबड्याच्या अंड्या येवढें मोतीं जे हल्लीं एक मजजवळ आहे तसेंच दुसरें आणावयाचें.

ह्यावेळीं हातिम मार्ग क्रमण करीत असतां एके रात्रीं एका वृक्षतळीं विश्रांतीस राहिला. आपला कार्यभाग कसा होईल ही त्याला चिंता लागली असल्यामुळें त्याला झोंप कशाची लागते. तो त्या विचारांतच होता इतक्यांत एक राजहंसाचें जोडपें तेथेंच विश्रांतीस आलें. नंतर थोड्यावेळानें मादी ह्मणूं लागली, हा प्रदेश भारी उष्ण. येथें आतां आपल्याच्यानें तग नियत नाहीं. राजहंस ह्मणाला बरें तर आपण उद्यांच मानस सरोवरीं जाऊं. नंतर मादी ह्मणाली, हा वृक्षाखालीं चिंताक्रांत झालेला मनुष्य कोण असावा बरें ? हंस ह्मणाला, तो इमन देशाचा राजपुत्र हातिम नामा होय. तो मोठा परोपकारी आहे, परार्थंच तो आज कितीएक दिवस प्रवास करीत आहे. प्रवासांत त्याला अनिवार संकटें भोगावीं लागलीं आहेत, व पुढें किती लागतील तीं लागोत. सांप्रत तो अंड्यायेवढें मोतीं मिळविण्यासाठीं जात आहे. मादी ह्मणाली, तें त्यास कसें प्राप्त होईल? हंस ह्मणाला मिळेल खरें; ऐक सांगतों. अशीं अंडीं घालण्याचें सामर्थ्य जगाच्या उत्पतीचे वेळीं आपलेच ठायीं ईश्वरानें ठेवलें होतें. परंतु हल्लींच्या ह्या पातकी युगांत तें सामर्थ्य नष्ट झालें. तावत्काळपर्यंत जीं अंडीं आपल्या जातीच्या प्राण्यांनीं घातलीं तीं सारीं समुद्रांत बुडून गेलीं. तथापि त्यापैकीं दोन मोत्यें अद्याप शिल्लक आहेत. त्याचें कारण असें कीं, दूरसमुद्रामध्यें गंगापूर नांवाचें नगर आहे. तेथील राजा सूर्यकांत. त्यानें सागराची प्रार्थना केल्यावरून त्यानें त्यास

दोन मोत्यें दिलीं. त्यांपैकीं एक त्यानें आपला परम मित्र राजा चंद्रहंस त्यास दिलें. त्यावर परचक्र येऊन तें मोतीं दुसऱ्याचे हातीं गेलें. अशाच रीतीनें जातां जातां तें बरझाक व्यापाऱ्या च्या कडे जाऊन त्याची कन्या जगदेक सुंदरी जी हसनबानू हिचेजवळ आहे.

दुसऱ्या मोत्याची हकीगत अशी आहे कीं, राजा सूर्यकांत हा तारुण्यांत मृत्यु पावला. त्यावेळीं तें राज्य भलत्याच्या हातांत गेलें. राणी त्यावेळीं गरोदर होती. प्राणभयास्तव ती तेव्हढें मोतीं घेऊन पळून गेली. जातां जातां ती समुद्रकांठीं येऊन आक्रोश करूं लागली. इतक्यांत नांवाप्रमाणेंच ज्याची करणी असा कृपासागर नांवाचा व्यापारी जलमार्गानें द्वीपांतरी जात असतां गोडें पाणी गलबतांत भरण्यासाठीं तेथेंच आला. आपणास त्यांनीं मदत करावी ह्मणून राणी त्यांना दीनवाणीनें हाका मारूं लागली. नंतर कृपासागराची गांठ पडतांच तिनें त्यास आपली हकीगत सांगितली. त्याला तें ऐकतांच अत्यंत दया उत्पन्न होऊन त्यानें निष्कांजलपणें राणीला आश्रय दिला. त्याचे हातून अशीं परोपकाराचीं बहुत कामें घडलीं होतीं. असो. पुढें तो स्वदेशीं गेला. तेथें गेल्यावर थोड्याच दिवसांनीं राणी प्रसूत होऊन तिला सुंदर पुत्र झाला. कृपासागराचा वृध्दापकाळ असून त्याला संतती नसल्यामुळें हाच आपला पुत्र असें समजून त्यानें समाधान मानून त्या मुलाची उत्तम काळजी घेतली. तो विद्या शिकण्यास योग्य होतांच त्याला उत्तम गुरूकडून सकळ विद्यांत निष्पन्न केलें. कृपासागराचे पश्चात पुढें तोच मुलगा त्याचे दौलतीचा वारस झाला. कृपासागर हा मूळचा मांडलीक होता, त्यायोगानें हा मुलगा पुढें राजाच बनला. पुढें पैगंबराचा शक चालू होतांच सर्व राज्यें खालसा झालीं; त्याबरोबर हेंही राज्य गेलें. त्यावेळीं चोही-

कडे मोठीच बेढाळी माजली होती. त्याधांदलींत तें मोतीं एका गंधर्वस्त्रीच्या हातीं लागून तें सांप्रत तिचे पुत्राजवळ आहे. तो बराझकशहरीं राज्य करीत आहे. त्याला सातवर्षांची कन्या आहे व त्याचा असा पण आहे कीं, जो कोणी ह्या मोत्याच्या उत्पत्तीविषयीं हकीगत सांगेल त्यास तें मोतीं व आपली कन्या हीं देईन. प्रिये, अशीं मोत्यें समुद्रांत बुडविल्यानंतर पुन्हां उत्पन्न झालीं नसून त्यांच्या उत्पत्तीचा इतिहास एक गंधर्वच जाणतो. तो तरी त्याला भूतभविष्य वर्तमानकाळचीं कृत्यें जाणतां येणाऱ्या रमलविद्येचा प्रभाव होय. ही विद्या त्यास अवगत असल्यावरूनच ही हकीगत त्याला माहीत आहे. तुला जी ही हकीगत मीं सांगितली तिचा उद्देश हाच कीं, ह्या वृक्षाखालच्या मनुष्यास ती कळून त्यानें ती त्या गंधर्वराजास सांगून आपले मित्राचें कार्य साधावें.

मादी ह्मणाली तें ठीक झालें, परंतु बराझक् शहरचा रस्ता ह्मणजे क्रूर राक्षसांचें तें माहेरघर आहे. तेथून हा मनुष्य जाईल कसा, शिवाय तो रस्ता कळेल तरी कसा; नर ह्मणाला आजवर जसें परमेश्वरानें त्याला सहाय्य केलें, तसें तो आतांही करील. तरी सांगतों कीं, मी आपलीं कांहीं पिसें त्याचे अंगावर झाडतों. त्यांचे अंगीं मोठा गुण आहे. तो असा कीं, ह्या पिसांतुन जीं, हिरवीं पिसें असतील, त्याची राख पाण्यांत कालवून त्या पाण्यानें अंघोळ करतांच हातीमाचें रूप पालटून त्याला भयंकर राक्षसाचें रूप प्राप्त होईल, व अंगालाही उग्र घाण येईल. येणेंकरून दुष्ट जनावरें तर काय पण राक्षसही त्याच्या वाऱ्याशीं उभे राहणार नाहींत. अशा रितिनें त्याचें दुष्ट प्रदेशांतून सहज जाणें होऊन नंतर मग त्यानें पांढऱ्या पिसांची राख पाण्यांत कालवून स्नान करतांच त्याची पूर्ववत काया होईल. असो. मग त्यानें बराझकशहरीं जाऊन

राजाची भेट घेणें आहे असें ह्मणतांच राजसेवक राजाची भेट करवितील. तेथें गेल्यावर हातिमानें आपला उद्देश कळवून त्याची आज्ञा घेऊन ही सारी हकीगत कथन करावी; ह्मणजे तें मोतीं त्याला सहज प्राप्त होईल. मादी ह्मणाली, स्वामी तुह्मांला तरी हें सारें कसें कळलें? नर ह्मणाला मोत्याबद्दल आपले पूर्वज वारंवार बोलत तें माझे ध्यानांत होतें; व हातिमासंबंधी मला माझ्या गुरूनें सांगून ठेवलें होतें. इतकें त्याचें बोलणें होत आहे तोंच पहांट झाली ह्मणून नरानें आपले पंख झाडून तीं दोघें पांखरें तेथून उडून गेलीं. हातिमही परमेश्वर स्तवन करून काफ पर्वताच्या बाजूनें चालता झाला.

नंतर एके रात्रीं तो वृक्षाश्रयानें राहिला असतां 'परमेश्वरा, ह्या संकटांतून मला सोडविणारा कोणीच नाहीं काय' असे शब्द उच्चारून कोणी शोक करीत आहे असें त्याचे कानीं येऊन तो शोध करीत आहे तों एक कोल्ही दगडावर डोकें फोडून आक्रोश करीत आहे असें पाहून तिला शोकाचें कारण विचारलें. ती ह्मणाली एका पारध्यानें माझा पति व पोरें धरून मारण्यासाठीं नेलीं आहेत. हातिम ह्मणाला तो रहातो कोठें? ती ह्मणाली येथून दोन कोशांवर. हातिम ह्मणाला तूं जर मला त्याचे ठिकाणीं नेशील तर मी तुझें कार्य करीन. ती ह्मणाली, तें खरें पण तुह्मी मानवप्राणी आमच्या पशूंच्या मांसाविषयीं भुकेलेले, सबब तुमचा मला विश्वास येत नाहीं. एक दुर्दैवी वानरी अशीच फसली. हातीम ह्मणाला ती कशी तें सांग. कोल्ही ह्मणाली, एक वानरी एका नदीकिनारीं रहात होती. एके वेळीं तिचा पति व पोरें एका पारध्यानें पकडून नेऊन एकास विकलीं. पुढें ती वानरी त्या दुःखानें व्याप्त होऊन बेधडक नगरच्या कोतवालाकडे जाऊन ह्मणाली, महाराज परमेश्वरानें संकटकालीं आपणावर दया करावी अशी जशी सर्वांस इच्छा आहे तद्वत

मजवरही आपण दया करावी. इतकें बोलून कच्चामजकूर सां- गून पतीची व पिलांची सुटका करून द्यावी असें ह्मणाली. तेव्हां कोतवालानें शिपायांस तिचे बरोबर देऊन पारध्यास क- चेरींत आणून ह्मटलें कीं, रे तूं हिचा पति व पोरें जीं पकडून आणलींस तीं देऊन टाक. तो ह्मणाला महाराज, तीं मी आप- णांसच विकलीं आहेत. आपणांस जर हिची दया येत असेल तर त्यांना मुक्त करा ह्मणजे मीही घेतलेले पैसे परत करतों. को- तवालास हें मोठेंच कोडें पडून त्यानें विचार करून ह्मटलें कीं, वानरीला वियोग नसला ह्मणजे झालें. तस्मात बाकीच्या वान- रांवर माझी प्रीति आहे ह्मणून हिलाही पिंजऱ्यांत घालून टाका- वें हेंच योग्य. असें बोलून त्यानें तिलाही कोंडून टाकलें. सरांश मनुष्यावर विश्वास ठेवल्यापासून त्या वानरीनेंही स्वातंत्र्य सुखा- चा नाश करून घेतला. तेव्हां मी तरी तुजवर कसा विश्वास ठेऊं. हातिमानें मग तिची खात्री होईसें बोलून रातोरात तिचे मागें चालून पारध्याचे घरीं गेला. मग कोल्हीस लांब एका वृक्षाचे राईत बसावयास सांगून आपणही एके ठिकाणीं बसला. नंतर उजाडतांच त्या पारध्याचे घरीं गेला, पारध्यानें त्याची इभ्रत पाहून त्याचा आदर करून 'कोण, येण्याचें कारण काय ह्म- णून विचारलें. हातीम ह्मणाला मी इमनचा रहाणारा, जातीचा मुसलमान. आजबरेच दिवस माझे अंगाचे सांधे दुखत आहेत. त्यास कोल्ह्याच्या ताज्या रक्तानें अंघोळ केली असतां सांधे बरे होतील असें एका वैद्यानें मला सांगितल्या दिवसा पासून मी कोल्ह्यांचा शोध करीत आहें. आपले येथें कोल्हे मिळतील असें मला काळच एकानें सांगितल्यावरून मी येथें आलों आहे. जर आपलेकडे कांहीं कोल्हे मिळतील तर मी किंमत देण्यास तयार आहें. पारध्यानें एक मोठा कोल्हा व सहा बच्चे त्याचे पुढें आणून बऱ्याच मोहरा मागितल्या. हातिमानें तेव्हढ्या

मोहरा त्यास देऊन तत्काळ ते प्राणी घेऊन निघाला. कोल्ह्यास गच्च बांधलें असल्यामुळें तो अगदीं मरणोन्मुख झाला होता तें पाहून हातिमास फार वाईट वाटलें. कोल्ही ह्मणाली जर मनुष्याचें ताजें रक्त मिळेल तर हा आतां सावध होईल. हातिमानें तत्काळ आपलें अंग कापून कोल्ह्यास रक्त पाजलें तेणें करून तो हुषार झाला. तेव्हां ते प्राणी हातिमाचे फार फार आभार मानून निघून गेले व हातिमही पुढें चालता झाला.

पुढें त्यास रेताड मुलूख लागला. तेथें पाणी नसल्यानें त्याचा जीव फारच कासावीस झाला. पुढें दूर कांहीं हिरवी जागा पाहून मोठी आशा धरून पुढें गेला तों त्याच्या एक ओहाळ दृष्टीस पडला. आतां पाणी पिणार तोंच तेथें एक प्रचंड भुजंग आडवा आलेला पाहून तो फारच घाबरला. इतक्यांत तो भुजंग मनुष्यवाणीनें ह्मणाला; हे इमनराजपुत्र, तूं खुशाल पाणी पिऊं नको व माझे मागोमाग ये. तें ऐकून हातिमास सानंदाश्चर्य वाटून तो पाणी पिऊन भुजंगाचे मागोमाग चालूं लागला. पुढें ते दोघे एका सुंदर बागेंत गेल्यावर भुजंगानें हातिमास एका बैठकीवर विश्रांतीस्तव बसवून जवळच एक लाल दगडांनीं बांधलेला तलाव होता त्यांत उडी टाकून भुजंग नाहींसा झाला. नंतर थोड्याच वेळानें त्या तलावांतून रत्नांनीं भरलेले सुवर्ण कलश घेऊन कांहीं सुंदर स्त्रिया हातिमाकडे येऊन ह्मणाल्या, आमचे राजानें ही आपणास भेट पाठविली आहे. हातिम ह्मणाला भेट पाठविणाराचे मी आभार मानतों; परंतु ह्याची मला मुळींच अपेक्षा नाहीं. इतक्यांत आणखीही तशाच स्त्रिया बाहेर आल्या, व पूर्ववतच ह्मणूं लागल्या. हातिमानेंही पूर्ववतच जबाब दिला. इतक्यांत आणखी कांहीं स्त्रिया खाण्याचे पदार्थ घेऊन येऊन हातिमास घेण्याविषयीं आग्रह करूं लागल्या. त्यास क्षुधेची तर अत्यंत पीडा होतीच तरी ज्यानें

आपणाकडे ह्या वस्तु पाठविल्या त्याचे भेटी शिवाय कांहींच घ्यावयाचें नाहीं असा त्यानें निश्चय केला. इतक्यांत ज्याची दिव्यकांती, दिव्य वस्त्रालंकारांनीं मंडित असा एक पुरुष पुष्कळ सेवकांसह तळ्यांतून बाहेर आला. नंतर उभयतांचे नमस्कार चमत्कार होऊन दोघे एका शयनावर बसले. मग दिव्यपुरुष हातिमास ह्मणाला, आपण मला ओळखलें नाहीं वाटतें; आपली माझी हीच पहिली भेट नव्हे. हातिम चकित होऊन ह्मणाला, पूर्वीं कधीं मी आपणास पाहिल्याचें मला स्मरत नाहीं. पुरुष ह्मणाला असें कां ह्मणतां, पाण्याच्या ओहोळापासून मीच आपणास येथपर्यंत आणलें. हातिम ह्मणाला सांप्रत आपलें हें रूपांतर झालें; तर मी आपणास कसें ओळखावें. असो. पण असें होण्याचें कारण काय तें मला अवश्य कळावें. तो ह्मणाला, आपण पुष्कळ दिवसांचे भुकेले आहांत तर आधीं क्षुधा शांत करा, मग कायतें कळवीन. तें ऐकून हातिम खाऊन पिऊन शांत झाल्यावर तो पुरुष सांगूं लागला.

माझें नांव वीरसिंह, एका गंधर्व राजाचा मी सेनापति होतों. माझ्याच सामर्थ्यावर त्याचें सर्व राज्य होतें. एकेवेळीं माझे मनांत अशी दुष्ट कल्पना आली कीं हें राज्य आपण बळकवावें. मग काय महाराज! दुसरेच दिवशीं मी सर्व सेनेसह राजवाड्यावर स्वारी करण्यास निघालों. राजाला ही खबर लागतांच त्यानें मंत्रसामर्थ्यें करून सर्व सैन्यासह माझें भुजंगरूप करून टाकलें. नंतर तेथून हिंडतां हिंडतां मी एका जोग्याचे मठींत गेलों. मला पूर्वस्थितीचें थोडेसें स्मरण होतें. मी जोग्याची भेट होतांच दीनमुद्रा दाखविली. तो मोठा ज्ञाता होता. त्यानें अंतरज्ञानानें माझें वृत्त जाणून ह्मटलें, झालें तें परत येणें कठीण तरी सांगतों कीं, इमन देशाचा राजकुमार या प्रदेशीं येईल. त्याचें दर्शन होतांच तुझा उद्धार होईल. नंतर त्याचेसह पुन्हां

भेटीला आल्यावर मी तुला तुझी पूर्वस्थिति देईन. तें ऐकून माझी स्मृति नष्ट होऊन मी सर्पयोनीतील सुख दुःखें भोगीत माझ्या ह्या बागेंत येऊन राहिलों. ह्या गोष्टीस कैक शतकें लोट टलीं. फक्त गेल्या वीस वर्षांपासून मला पूर्वस्थितीचें ज्ञान हो ऊन मी आपली मार्गप्रतिक्षा करीत होतों. माझें केवळ जन्म-जन्मांतरींचें पुण्य ह्मणूनच आज आपलें दर्शन झालें. तर आतां त्या जोग्याचे मठाकडे येण्याची तसदी घ्यावी. हातीम उदार पुरुषच! तत्काळ त्याचे बरोबर मठांत गेला. जोग्यानें एक अर्धा दिवस त्यांस ठेऊन गंधर्वास पूर्वस्थितीप्रत केलें. तेणेंकरून गंधर्वास मोठा हर्ष वाटून तो हातिमाचे आभार मानीत बागेंत आला. नंतर हातिमाचाही तेथपर्यंत येण्याचा मजकूर विचारून घेऊन अंड्या येवढ्या मोत्याच्या प्राप्तीस्तव हातिमास पालखींत बसवून पुष्कळ सैन्यासह बराझूक शहराकडे त्याची रवानगी दिली. त्याप्रमाणें कांहीं दिवस मार्गक्रमण केल्यावर खा-णपिण्याच्या अगत्यामुळें एके स्थळीं त्यांनीं मुक्काम केला; तें दुष्ट राक्षसांचें स्थान होतें. गैरमाहितीमुळें ते तेथें उतरले गेले व शेवटीं प्रसंगांत सांपडले. ह्मणजे असें झालें कीं, हातिमास घेऊन जाणारे पुढें गेले व सैन्य मागून येत होतें. त्यानें जेथें मुक्काम केला तेथें चौघे भोई व पांचवा हातिम. त्यांपैकीं, दोघे भोई अन्नोदकाच्या शोधास गेले; तोंच भयंकर राक्षसांची एक टोळी तेथें आली. पालखींत मनुष्य असून दोन गंधर्व त्याचें रक्षण करीत आहेत असें पाहतांच राक्षसांनीं हातिमास आपले कबजांत घेतलें. गंधर्व जरी दोघेच होते तरी त्यांनीं राक्षसांतून पुष्कळांस जखमी केलें. तरी शेवटीं राक्षसांनीं त्यांनाही पकडून त्रिवर्गास आपले राजाकडे नेलें. राजानें त्यांची थोडी फार चौकशी करून त्यांना तळघरांत कोंडून ठेवण्यास हुकूम केला. कोतवालानें ताबडतोब त्यांची तशी व्यवस्था लावली. ह्या पुण्य

पुरुषास तुह्मी दुःखवूं नका वगैरे दोघा गंधर्वांनीं त्यास दर्शवून सांगितलें तरी कोणी जुमानलें नाहीं.

इकडे जे दोघे शिधासामुग्रीसाठीं गेले होते ते परत येऊन पाहतात तों त्यांचे पैकीं त्यांस कोणी न दिसून कांहीं मृत व कांहीं घायाळ राक्षस त्यांचे दृष्टीस पडले. तेव्हां त्रिवर्गास राक्षसांनीं पकडून नेलें असावें हें तर त्यांना वाटलेंच. इतक्यांत एक घायाळ होऊन हळहळत पडलेला राक्षस त्यांचे दृष्टीस पडला. त्यांनीं त्याची थोडी फार शुश्रुषा करून त्यास सावध करून कच्चा मजकूर त्याचे कडून समजावून घेऊन त्याला बांधून आपल्या धन्याकडे नेऊन कच्चें वर्तमान विदित केलें. तें ऐकतांच वीरसिंहास परम क्रोध येऊन गेला. तो त्या एकट्या राक्षसावरच फार जळफळूं लागला. राक्षस ह्मणाला महाराज आपणास सर्पयोनी प्राप्त झाली हेंच धन्य आहे. परंतु पुन्हां पूर्वरूप पावलां हें जर कळतें तर आह्मी अथवा आमचे राजे ह्यांचे कडून काडी मात्र आपला अन्याय झाला नसता. असो. वीरसिंह फारच खवळून गेला. त्यानें तत्काळ सैन्य तयार करून स्वताच कूच केलें. वीरसिंह राक्षस राज्यांत आला तेव्हां तो पुष्कळ सैन्यानिशीं शिकारीस गेला होता. त्याची ह्याची वाटेंत गांठ पडून उभयतांचें भयंकर युद्ध होऊन गंधर्वांनीं राक्षस राजास कैदी करून वीरसिंहा पुढें आणलें. तेव्हां वीरसिंह ह्मणाला कायरे, आमच्या लोकांस त्रास द्यावयाचा नाहीं अशा तुह्मी शपथा घेतल्या आहेतनां ? राक्षस ह्मणाला, जा जा मी त्या शपथांस विचारीत नाहीं.

तें त्याचें उर्मट भाषण ऐकतांच राक्षसराजास जाळून टाकण्यास हुकूम दिला. हुकमाप्रमाणें लागलीच सर्व तयारी झाली. आतां प्रसंग कठीण असें जाणून राक्षसराजा ह्मणाला, महाराज मी आपले लोकांस सोडून दिलें तर. गंधर्व ह्मणाला तर मग

तुझा आपला तंटा मिटून आपण उभयतां जन्माचे प्रियमित्र होऊं. तें ऐकून कांहीं गंधर्वांस बरोबर घेऊन राक्षसानें त्या त्रि-वर्गास तेथें आणून पोंचविलें. हातिमास पाहतांच वीरसिंहास मोठा संतोष झाला. नंतर राक्षस हे दुष्टच असें समजून त्यानें राक्षसराजास जाळून टाकलें; व त्याचें राज्य खालसा करून तेथें आपले पैकीं अधिकारी नेमला; आणि मोठे शूर असे चार पुरुष बरोबर देऊन हातिमाची पुढें रवानगी करून दिली.

नंतर कांहीं मार्ग क्रमण केल्यावर ते एका पर्वतावर उतरले. तेथें एक गंधर्वराजकुमार शोक करीत होता. तें ऐकून हातिमानें त्याचेकडे जाऊन शोकाचें कारण विचारलें. त्या तरुणानें प्रथम हातिमास त्याची हकीगत विचारली. मग 'मी इमनचा राजा असून बराझकशहरीं अंड्या येव्हडें मोतीं आणण्यास जात आहें असें पण सांगितलें. गंधर्वकुमार ह्मणाला, तें मोतीं तेथें आहे पण त्याचा जन्मवृत्तांत सांगणारास तें प्राप्त होणारें आहे. मग हातिमानें त्यास त्याच्या दुःखाचें कारण विचार-ल्यावरून तो ह्मणाला मी एकदां दरबारांत गेलों असतां बराझक येथील राजकन्येच्या सौंदर्याची तारीफ ऐकून तिचेवर लोभ धरून बराझक राजाला भेटून आपला उद्देश कळविला. त्या-वेळीं मोत्याच्या उत्पत्ती विषयींचा इतिहास जो सांगेल त्यासच कन्या व मोतीं द्यावयाचें असा त्याचा संकल्प त्यानें मला कळ-विला. मग मला मोत्याच्या उत्पत्तीचा इतिहास माहित नस-ल्यामुळें मी शोक करीत येथें येऊन पडलों. येतांना राजवाड्या-चे खिडकींत ती राजकन्या उभी असतांना पाहून तर मी काम-बाणें करून फारच ताप पावलों. हातिम ह्मणाला बरें तर तूं चिंता करूं नको. माझे बरोबर तूं त्या शहरीं चल. मी तुझें कार्य साधीन. तो ह्मणाला, तेथपर्यंत जाणें मोठें भयंकर आहे. हा[illegible] मला त्याची काळजी तुला नको; चल. इतकें ह्मा-

त्यावर गंधर्वांनीं त्या दोघांसही पालखींत बसवून वायुवेगानेंच चालविलें.

ते मार्ग क्रमण करीत असतां विकर्ण नांवाच्या राक्षस राज्यांत गेले. तेव्हां हे विकर्णाचे दृष्टी पडून त्यानें ह्यांना पकडून आणून कोण काय वगैरे विचारलें. तेव्हां गंधर्व सेवकांनीं सांगितलें कीं, गंधर्व सेनापति वीरसिंह ह्यांचें आज्ञेनें ह्या दोघांस आह्मी बराझक शहरीं घेऊन जात आहोंत. विकर्ण हंसून ह्मणाला, तुह्मी खरें बोलतां कां ? कैक शतकें लोटलीं असतील आजवर ' वीरसिंहास त्याचे सेनेसह सर्परूप प्राप्त झालें आहे. सेवक ह्मणाला तें खरें, परंतु ( हातिमाकडे बोट करून ) ह्या पुण्यपुरुषानें त्यांना पुन्हा नुकतेंच पूर्व स्थितींत आणलें. विकर्ण ह्मणाला बरें तर हा दुसरा कोण. गंधर्वकुमार स्वतांच ह्मणाला कां आपण मला जाणत नाहीं काय ? राक्षस निरखून पाहून ह्मणाला हां आलें लक्षांत. मी आतां तुला उपद्रव करीत नाहीं; पण ह्या मनुष्यास मात्र मी खाऊन टाकणार. हा राक्षस असें करण्यास चुकणार नाहीं असें जाणून गंधर्वकुमार ह्मणाला विकर्णा, ह्या पासून माझें कांहीं काम होणें आहे करतां मी तुला ह्या एकाबद्दल दहा मनुष्यें भक्षणास देतों. विकर्ण ह्मणाला बरें तर, जर तूं असें न करशील तर मी ह्या मनुष्यास सोडणार नाहीं. मग पांच दिवसांचा करार करून तो तेथून निघाला. नंतर विकर्णानें गंधर्व पुत्राचेमतें हातिमास नगराबाहेर एका सुंदरशा बागेंत ठेऊन दरवाज्याशीं पहारा ठेवला. नंतर सेवकांसह पालखींत बसून तो गंधर्वकुमार एका जंगलांत गेला. मग एका वृक्षातळीं बसून प्रथम विचार केला कीं, गंधर्वसेनापति जो वीरसिंह ह्मास हें वर्तमान सांगून त्याचेकडून विकर्णाची खोड मोडावी; परंतु येवढें होईपर्यंत दिवसगत लागून पांचवे दिवशीं अस्तमानी हातिम मारला जाईल. तर पहारेकरी

बेसावध असतां हातिमास अचानक तेथून उडवावें. मग सर्वा- नुमतें हाच विचार पसंत ठरून ते परत माघारे फिरले. ती अगदीं दोन प्रहर रात्रीचीच वेळा होती. त्यामुळें पहारेकरी खुशाल घोरत पडले असून जिकडे तिकडे सामसूम होती. ही योग्य संधी पाहून गंधर्वकुमारानें एकदम गंधर्वसेवकांकडून आ- काशमार्गानें बागेचे बंगल्यांत पालखी नेऊन हातिम गाढ नि- द्रिस्त असतांच त्यास पालखींत घालून रातोरात वायुवेगानें गमन करून उजाडल्यावर एका निर्भय स्थळीं उतरला. इकडे बागेचे दरवाजे जशाचे तसेच लावले असल्यामुळें पाहरेकऱ्यांस संशय येऊन ते उघडण्याचें कांहींच कारण पडलें नाहीं. त्यामुळें ह्यांना पांच दिवस प्रवास करण्यास कोणचाच अडथळा न येतां हे खूप लांब निघून गेले. विकर्णानें पांचवे दिवशीं अस्तमानपर्यंत वाट पाहून हातिमास फाडून खाण्यासाठीं आणण्यास हुकूम दिला. पण हातिम तेथें नाहीं असें ऐकतांच पाहरेकऱ्यांस चा- बकानें खूप मारून कोंडून ठेवण्यास हुकुम दिला. आह्मी हा- तिमास सोडून दिलें नाहीं वगैरे ते खूप ओरडले, पण तिकडे कोणींच लक्ष दिलें नाहीं.

पुढें विकर्णाच्या एका सरदाराची व ह्यांची गांठ पडली. तेव्हां बहुधा हे पळून आले अशी कल्पना करून ह्यांस पकडून न्यावें अशा विचारानें त्यानें पालखी खाली पाडली. त्याचा दुष्ट हेतु गंधर्वकुमाराच्या ध्यानांत येतांच त्यानें तरवारीनें त्याचे चटकन दोन्ही हात छाटून घेतले. त्यामुळें —'थांबा तुमची खोड मोडतों' असें बोलून जळफळतच तो निघून गेला. इकडे ह्यांनींही मोठ्यावेगानें मार्गक्रमण आरंभिलें. पुढें ते राक्षसाच्या दाटवस्तींत येऊन पोंचले. तेव्हां येथील राक्षसांचा आमचा पू- र्वापारद्वेष असल्यामुळें येथून फार बेतानें जाणें भाग असें गंधर्व कुमारानें ह्मटलें. हातिम ह्मणाला, तर मग मी राक्षसाचें रूप

धारण करतों. दिवसा कोठें तरी लपून रात्रीं मार्ग चालूं. तुझी खुषी असल्यास बोल. त्यानें ह्मटलें उघड तर मला तसें करतां येणार नाहींच पण मी आकाश मार्गानें रात्रीं गमन करीन. तुह्मीं खुशाल दिवसा चालावें. व रात्री वस्ती कराल तेथें मी तुह्मांस भेटत जाईन. मग तत्काळ हातिमानें गंधर्व सेवकांची माघारी रवानगी करून हंसपक्षाच्या पिसांनीं राक्षसरूप धारण केलें. तें पहातांच गंधर्वकुमारास मोठें आश्चर्य वाटून त्यानें असें होण्याचें कारण विचारलें. मग कदाचित् हा फसवील अशा कल्पनेनें त्यानें मोत्यांच्या जन्मवृत्तांतावांचून सारी हकीगत सांगून ठरल्याप्रमाणें मार्गक्रमण चालविलें. अशा रीतीनें जात असतां एके स्थळीं ते वस्तीस राहिले असतां दोघेही झोपीं गेले. त्यावेळीं गंधर्व आकाशांतून खालीं उतरत असतांना एका राक्षसानें त्याला पाहून आपल्या मित्रास बोलावून ह्या दोघांस आपले राजाकडे घेऊन जाण्याची मसलत करूं लागले, त्यांची चाहुल गंधर्वकुमारास लागतांच त्यानें हातिमास जागेकरून ती हकीगत सांगितली. हातिम राक्षस बनला होताच. तो ताडकन उठून त्या दोघांस ह्मणाला, आह्मी दमून येथें पडलों असतां आमची झोंप कां बरें मोडलीत, राक्षस ह्मणाले तुह्मी कोण. हातिम ह्मणाला, मी तर प्रवासी आहे, जायाचें कोठें तें मला कळत नाहीं, कां ह्मणशील तर गंधर्वसेनापति जो वीरसिंह ह्यानें आमचा राजा शूर्पकर्ण ह्यास ठार मारलें, व एकदम आमचे नगरास आग लावून दिली, कारण इतकेंच. वीरसिंहाचा कोणी मित्र बराह्मक शहरीं जात असतां आमचे राजानें त्याला पकडून कैद केलें' शेवटीं तो मनुष्य तर बराह्मक शहरीं गेलाच, मी मात्र निराश्रित होऊन कोठें तरी हिंडत आहे. ते ह्मणाले बरें हा दुसरा कोण? हातिम ह्मणाला हा माझा कर्णपूरचा राजपुत्र आहे, ते

ह्मणाले बरें तर तूं आमचा स्वजातीयच आहेसच आणि कर्णपूरचा राजा आमच्या राजाचा मित्र आहे तर तुह्मी आतां निर्भय असा. बराझक शहरीं गेलेल्या मनुष्याचा मात्र आह्मी तपास काढतों, असें ह्मणून ते निघून गेले,

मग आतां येथें राहणें ठीक नाहीं असें जाणून ते मोठ्या वेगानें पुढें निघून गेले, पुढें त्यांना प्रचंड सागर लागला तेव्हां मात्र हातिमाला मोठी चिंता प्राप्त झाली. तेव्हां गंधर्व कुमार ह्मणाला तुह्मी कांहीं काळजी करूं नका. येथून पांच कोशांवर सोमदत्त नांवाचा राजा रहातो तो माझा मित्र आहे. त्याचेजवळ पाण्यावरून चालणारे घोडे आहेत. मी आतांच घेऊन येतों. असें बोलून मित्रास भेटून वर्तमान सांगून त्यानें दोन घोडे आणले. त्यांवर बसून दोघे समुद्रांत मार्ग क्रमूं लागले. हातिमास तो एक नवाच चमत्कार आढळला. पुढें हातिमास फारच तहान व भूक लागून तो कासावीस होऊं लागला. त्या वेळीं गंधर्वानें त्यास एक फळ खावयास दिलें. तेणेंकरून हातिमास खूपच हुशारी येऊन पोंचली. नंतर बरेच दिवस ते मार्ग क्रमून भूप्रदेशीं येऊन उतरले. हातिमास वाटलें बहुधा आपण बराझक शहरा नाजिक पोंचलों. पण गंधर्वकुमार ह्मणाला—छीं अजून दहा दिवस मार्ग क्रमला पाहिजे, पण आतां कांहीं हरकत नाहीं. येथून जवळच माझें राज्य आहे. मार्गांत त्रास न व्हावा ह्यासाठीं मी सैन्य घेऊन येतों. तुह्मी येथें असा. हातिम ह्मणाला सैन्याचें हेंच कारण असेल तर आणवा. बाकी लढायी करून मोतीं आणायचें नाहीं. तो ह्मणाला तें मी जाणतों, बहुधा चौथे दिवशीं येईन असें ह्मणून निघून गेला. हातिमास एकटें राहणें संवयीचेंच होतें. तो हिंडतां हिंडतां एका सुंदरशा बागेंत जाऊन आनंदानें राहिला.

इकडे गंधर्वकुमार नगरानजीक जातांच सेवकानें त्याच्या

बापास पुत्र आल्याची वर्दी दिल्यावरून तो मोठ्या हर्षानें पुत्रास भेटला. नंतर बराझक शहरचें वर्तमान विचारल्यावर तो ह्मणाला बाबा, जातेवेळीं आपला आशीर्वाद न घेतल्यामुळें मला हेलपाटा पडला. असें बोलून हातिमास सांगितलें तें वर्तमान सांगून ह्मणाला, माझी तेथें निराशा झाल्यावर मी रानो-रान हिंडून एका पर्वतावर शोक करीत असतां हातिमनामा इमनचा राजपुत्र मला भेटला. तें मोतीं आणण्यासाठींच तो चालला होता. तो त्या मोत्याची उत्पत्ति जाणतो. तें ऐकून बाप हंसून ह्मणाला आपण गंधर्व; आपणास माहीत नाहीं तें मनुष्यास माहीत आहे काय? पुत्र ह्मणाला छी बाबा, असें बोलूं नका. तो सामान्यांतला मनुष्य नाहीं. तो भूतभविष्य ज्ञाता आहे. त्यानें बहुत प्रवास केला आहे. रमल शास्त्रांत तो पारं-गत आहे. तर आतां कांहीं सैन्य बरोबर द्यावें ह्मणून मी येथें आलों आहें. वगैरे बरेंच त्यानें बापास सांगून सैन्य घेऊन चौथे दिवशीं हातीमास भेटला. नंतर हातिमानें पूर्व रूप धारण करून ते दोघे प्रचंड सेना घेऊन इष्ट शहरीं जाऊन पोंचले.

इकडे हें सैन्य येत आहे असें पाहून हेरानीं आपले राज्यांत जाऊन खबर दिली कीं, कोणी गंधर्व प्रचंड सेनेनिशीं चढायी करून आपलेवर येत आहे. तें ऐकतांच तो गंधर्वराजाही प्रचंड सेना घेऊन यांचेशीं सामना देण्यासाठीं आला. हें कुमार गंध-र्वाचे लक्षांत येतांच भलताच प्रसंग होऊं नये ह्मणून त्यानें ताब-डतोब आपले बद्दलची हकीगत गंधर्वराजास कळविली. त्या-मुळें त्यास संतोष वाटून तो ह्याचे भेटीस पुढें आला. नंतर उभयतांच्या मुलाखती होऊन हातिमानें आपला सर्व हेतु त्यास कळविला. त्यानें मोठ्या आनंदानें आपली अट सांगून ह्मटलें कीं, आपण माझा हेतु पूर्ण केल्यास तें मोतीं व माझी कन्या हीं तुमचींच आहे. लागेल त्या प्रमाणें त्यांची व्यवस्था लावावी.

तर हसनबानूच्या पांच प्रश्नांचा ज्यानें उलगडा केला तो आ-
ली मनीच्छा पूर्ण करीलच, असें मानून राजानें दरबार भरवून
तिमास मोठ्या सत्कारानें तेथें बसविलें. हातीमानें तत्काळ
त्याच्या उत्पत्तीची प्राचीन कथा तेथें निवेदन केली. ती
यास पटतांच गंधर्वराजानें मोतीं व कन्या हातिमाचे स्वाधीन
केलीं. हातिमानें तत्काळ गंधर्वकुमाराशीं तिचें लग्न लावून दिलें.
गंधर्वराजानें फारच मोठा समारंभ केला. मग हातिम तेथून
निघून गंधर्वकुमाराचे आग्रहावरून त्याचे गांवीं गेला. तेथेंही
खूप मेजवान्या झोडून स्वारी वीरसिंहाच्या राज्याकडे जावयास
निघाली. तेव्हां त्याचे मित्रानें तेथपर्यंत पोंचविण्यास कांहीं नि-
वडक सैन्यही त्याचे बरोबर दिलें. नंतर तेथून हातीम मजल-
दरमजल करीत चालता झाला. वाटेनें कांहीं संकटेंही त्याचेवर
आलीं. परंतु युक्तीप्रयुक्तीनें निभावून तो वीरसिंहाकडे येऊन
पोंचला. त्याचे भेटीनें वीरसिंहास मोठा संतोष होऊन त्यानें
आनंदप्रदर्शनार्थ नाच, बैठका, मेजवान्या वगैरे बरेच प्रकार केले.
नंतर हातिमानें त्याची रजा मागितली. वीरसिंहानें विमान
देऊन शहाबादपर्यंत पोंचाविलें. तेथें गेल्यावर आपला मित्र
मुनीरशहा व बानू ह्यांची गांठ घेऊन सकल वृत्तांत निवेदन
करून तें मोतीं तिचे स्वाधीन करता झाला. तें पाहतांच तिला
पराकाष्टेचा आनंद होऊन तिनें हातिमास मेजवानी दिली.
नंतर ह्मणाली आतां फक्त ' हमामबादगीर्दची खबर आणणें
येव्हढ्या सातव्या कामाचा निकाल केलात ह्मणजे मी आपली
उतराई होण्यासाठीं आपल्या मर्जीनुरूप वागण्यास खुषी
आहें. तें ऐकून हातिम तिची रजा घेऊन एक अर्धे दिवसानें
तेथून चालता झाला.

# सवाल सातवा.

'हमाम बादगीर्देची खबर आणणें.'

शाहाबादेहून हातीम निघून वनोपवनें ओलांडीत चालून एका शहरीं गेला, तों तेथें कांहीं लोक एका विहिरी भोंवतीं जमले असून शोकयुक्त झाले आहेत असें पाहून हा तेथें जाऊन कारण विचारूं लागला. तेव्हां एकजण म्हणाला आमच्या गांवच्या एका वैद्याचा मुलगा आज दोन दिवस झाले ह्या विहिरींत पडला आहे. आधींच तो वेडा होऊन वेळोवेळ ह्या विहिरीवर येऊन बसे. त्यांत विशेष चमत्कार हा कीं, तो फुगून ही बाहेर येईना व विहिरींत त्याचें प्रेतही सांपडेना. इतकें बोलणें होत आहे तों त्या मुलाचीं आईबापें आक्रोश करीत तेथें आलीं. हातिमास ती गोष्ट फारच वाईट वाटून तो म्हणाला, मला वाटतें कोणच्याही प्रकारें कांहींच थांग लागत नाहीं; तर तो मुलगा जिवंतच सांपडेल अशी माझी कल्पना आहे. चिंता नाहीं बसा तुम्ही, मी आतांच शोध करून येतों. असें म्हणून स्वारीनें विहिरींत उडी टाकिली. पुढें जमीनीला पाय लागतांच डोळे उघडून पाहतो तों एका मैदानप्रदेशीं आपण आहोंत असें त्याला दिसलें. तेणेंकरून आश्चर्ययुक्त होत्साता इकडे तिकडे हिंडत असतां एक उत्तमसा बगीच्या त्याचे दृष्टीस पडून त्याचें दार उघडें आहे असें पाहतांच तो आंत गेला.

नंतर–पाहतो तों एक रत्नखचित महाल त्याचे दृष्टीस पडला. फार नामी तो बंगला. जिकडे तिकडे भरगच्ची गालिचे टाकले असून खिडकीवरून वाळ्याचे पडदे सोडले आहेतच, बंगल्यांतून मोठमोठें बिलोरी सामान टांगलें आहेच. असा थाट पाहून तो बेधडक आंत घुसून मुख्य दिवाणखान्यांत गेला.

थें फारच विलक्षण रोषनाई केली होती. शिवाय तेथें उत्तमशा ठकीवर एक उत्तम तरूण सुंदरी व एक तरुण पुरुष अशीं ाघें बसलीं असून त्यांचे सेवेंत कितीएक दासी तत्पर आहेत, त्यगायन चाललेंच आहे अशा स्थळीं बेधडक हातीम गेला. यास पाहून ती सुंदर तरुणी शेजारीं बसलेल्या तरुणास झ- ाली तो पहा एक कोणी तुझ्या मानवांपैकींच पुरुष दिसतो. याशीं कांहीं बोलणें असल्यास त्याला येथपर्यंत बोलावतें. यानें रुकार देतांच एका दासीकडून हातिमास जवळ बोलावून ुंदर बैठकीवर बसविलें. नंतर नाचगाणें आटोपल्यावर तिनें ोण, कोठून आलां वगैरे हातिमास विचारलें. तेव्हां मी इमनचा ाणारा, हमामबादगीर्दची खबर आणण्यास जात असतां ्का शहरीं आलों. वगैरे तेथपर्यंतचा मजकूर हातिमानें सांगि- तला. तें ऐकून तो तरुण ह्मणाला महाराज, ज्याचे शोधार्थ आपण येथें आलां तोच मी. ज्या विहिरींत आपण उडी मा- रलीत त्या विहिरीवर मी एक वेळ एकटाच आलों असतां एका- एकीं ही सुंदरी वर निघून हिनें माझे पंचप्राण आपलेकडे ओढून घेतले. नंतर नित्य मी ती वेळ साधून विहिरीवर आलों कीं हिनें भेटून मला विकळ करून चालतें व्हावें. शेवटीं एक वेळ हिच्या करून हिचे मागोमाग उडी टाकली; तों येथें येऊन पोंचून आज दोन दिवस अशा आनंदावस्थेंत आहे.

हातिम ह्मणाला, हें सर्व ठीक झालें पण वेड्या तुझी आईबापें तुजसाठीं शोकाक्रांत झालीं आहेत त्यांची वाट काय? सुंदर स्त्री मिळालीह्मणून आईबापास क्लेश देणें हा पुत्रधर्म आहे काय? हें अत्यंत अनुचित कर्म होय. तो ह्मणाला तें खरें, पण जर आतां माझी प्रिया रजा देईल तर मी त्यांना भेटून त्यांचें शांतवन करीन. तेव्हां हातीम तिलाही ह्मणाला, तुमचे कृपेनें हा तरूण तर चैनीत आहे, पण ह्याच्या मातापित्याची वाट काय? त्यांना

भेटून येण्याची ह्यास परवानगी द्याल तर मजवर उपकार होतील. स्त्री ह्मणाली हा आपले खुशीनें येथें आला, मी बळानें आणलें नाहीं; तेव्हां जाण्यासही तोच मुकत्यार आहे. तरुण ह्मणाला बरें तर आतां मी घरीं जातों. तूं वेळोवेळ माझी भेट घेत जावीस. आतां ती काय ह्मणते हें ऐकण्या विषयीं हातिम आतुर झाला होता. तोंच तीही ह्मणाली, पुरुष किती तरी आधाशी आहेत. आह्मी गंधर्वकन्या असून मानवाशीं संबंध केला, हेंच आधीं अधिक, असें असून हा मूर्ख ह्मणतो कीं, 'माझे भेटीस येत जा.' असें तिचें सक्रोध भाषण ऐकून हातिम ह्मणाला, स्त्रिये मीं गंधर्वांचीं बरींच राज्यें पाहिलीं आहेत. त्यांतून किती एकाचे मानवाशीं संबंधही आहेत. खुद्द माझी स्त्री गंधर्वकुळांतलीच आहे. ती ह्मणाली असेल तसें तें मी खोटें ह्मणत नाहीं; परंतु यांत केवळ खरी प्रीतिच उघड होत नाहींका? तरुण ह्मणाला हो उघडच आहे. मी आईबाप, गणगोत, इष्टमित्र, धनदौलत ह्या सर्वांची आशा सोडून जी जलसमाधी घेतली हें तुजविषयींची खरी प्रीति दाखवीत नाहींकां? ती ह्मणाली तें असो, तुझी जर मजवर खरी प्रीति असेल तर तापलेल्या तुपाच्या कढयींत माझेबरोबर उडी टाकतोस कां? तो ह्मणाला तुझ्या आधीं टाकतों. तें ऐकून तिनें तावडतोब सिद्धता करून तूप चांगलें कडकडतांच त्याला उडी टाकावयास सांगितलें. तोही अगदीं तदाकार होऊन गेला असा, यामुळें तत्काळ तयार झाला. तो आतां उडी टाकणार तोंच त्यास धरून ती ह्मणाली, पुरें आतां साहस, माझेठायीं खरी प्रीति आहे. आतां तुह्मी खुशाल जावें. मी आपले भेटीस येत जाईन, असें बोलून तिनें सेवकांकडून त्यांना वर आणून पोंचविलें. विहिरीवर मंडळी शोकाक्रांत होतीच. त्यांनीं ह्यांस पाहतां पराकाष्ठेचा आनंद मानून पितापुत्रांच्या भेटी केल्या. सर्वांनीं हातिमास मोठ्या थाटानें गांवांत नेलें

व ह्या कीर्तीनें सर्व लोक त्याच्या भेटीस गेले. नंतर एक-दोन दिवस राहून गंधर्वस्त्री संकेताप्रमाणें येत असते असें पाहून तो रजा घेऊन चालता झाला.

नंतर कांहीं दिवस मार्गक्रमण केल्यावर एका गांवाजवळ त्यास एक फकीर भेटला. त्यास यानें सलाम केल्यावर त्यानें ह्यास ह्याची हकीगत विचारली. ती हातिमानें सांगितल्यावर फकीर त्यास आपले मठांत घेऊन गेला. नंतर ईश्वरस्तवन केल्यावर दोघांचीं भोजनें झालीं. नंतर शांत बसल्यावर फकीर ह्मणाला हातिमा, तूं हमामबादगीर्दकडे जाण्याचा नाद सोडून दे. तिकडे गेले त्यांतून एकही आजवर परत आला नाहीं. हातिम ह्मणाला तें जरी धोक्याचें स्थान असलें तरी परमेश्वरावर माझा भरंवसा आहे. आजवर मी पुष्कळ प्रवास केला, तो परमेश्वराचे कृपेनेंच शेवटास गेला. त्याचप्रमाणें आतां कां होणार नाहीं. फकीर ह्मणाला अरे इतर ठिकाणें वेगळीं. हें ठिकाण मुळींच इंद्रजाल आहे. त्याची तुला माहिती नसून जर तूं दुराग्रह धरशील तर एक हट्टी बेडूक जसा पश्चात्ताप पावला तीच तुझी अवस्था होईल. मग हातिमानें बेडकाची गोष्ट विचारल्यावरून फकीर ह्मणाला.

एका तळ्यांत पुष्कळ बेडूक होते. त्यांपैकीं एकास स्थळांतर करावेंसे वाटून त्यानें तसें करण्याचे फायदे उत्तमरीतीनें आपले मंडळीस लागुकरून दाखविले. परंतु इतर बेडकांनीं त्याचा चकचकीत उपहास केला. त्याचा तो नाद न सुटत एके दिवशीं तो सहकुटुंब तेथून निघाला. वाटेनें जातांना त्यानें पूर्वस्थळाची निंदा व पुढें मिळणाऱ्या स्थळाची स्तुति भारी केली. लागलाच एक तलाव त्याचे दृष्टीपडून तो आंत शिरूं लागला. त्या तळ्यांत पूर्वींच एक सर्प वस्ती करून होता. त्यानें तेथलीं सारी बेडकें खाऊन टाकलीं होतीं. सांप्रत तो क्षुधित

होत्साता भक्षाची वाटच पहात होता. मग हा असा प्रियभक्ष दृष्टी पडतांच स्वारीनें गटागट एकेक बेडूक घशाखालीं उतरण्यास आरंभ केला. हें अरिष्ट पाहून त्या बेडकानें सर्पाची नजर चुकवून तळ्यांत उडीमारून तो चिखलांत रुपून बसला. नंतर सर्प कोठें दूर जातांच स्वारी निघून एकटीच आपले पूर्वस्थळीं गेली. मग एकटाच कां आलास ह्मणून त्याचे मित्रानें विचारतांच तो रडूं लागला. तेव्हां कोणी तरी ह्याच्या कुटुंबाचा नाश केला व ह्याला कारण ह्याचा हट्ट असें जाणून सर्वांनीं त्यास त्या तळ्यातून घालवून दिलें. इतकें सांगून फकीर ह्मणाला, पहा दुराग्रहामुळें तुला असाच पश्चाताप भोगावा लागेल. हातीम ह्मणाला, केवळ परासाठीं मी येव्हढे क्लेश सहन केले असून आतां प्राणाचें भय धरून थोड्यासाठीं मागें फिरूं काय? छी कधींही फिरणार नाहीं. तर त्या पर्वताचा मार्ग ठाऊक असल्यास सांगा. हा ऐकत नाहीं असें जाणून फकीरानें त्यास बरेंच लांब आपलेबरोबर नेऊन ह्मटलें, आतां जे हे दोन रस्ते फुटताव ह्यांतून उजव्या रस्त्याने जा. पुढें तुला मोठ मोठीं गांवें वगैरे व एक भयंकर पहाड लागेल. ईश्वरकृपेनें तेथून निभावल्यावर पुढें असेच दोन रस्ते लागतील तेव्हां डाव्यारस्यानें जा. हा बराच लांबीचा आहे व उजवेबाजूचा हा जवळचा आहे, परंतु तो फारच भयंकर आहे. सेरव्ही ते दोन्हीं रस्ते त्या पर्वताकडेस जातात. हातीम ह्मणाला जें प्रारब्धीं असेल तें काळाच्यानेंही खोडवणार नाहीं. असो. इतकें बोलून त्यास सलाम करून हातिम तेथून पुढें निघाला.

कांहींका दिवसांनीं तो एका शहरानजीक आला असतां गांवांबाहेर एक विस्तीर्ण मंडप घातला असून स्वयंपाकाची मोठी धांदल उडाली आहे. एकीकडे सुंदर बैठकांवर नवयौवना नृत्य, गीत, वादन करीतच आहेत. लोकांचे थव्याचे थवे

येतजात आहेत, असें पाहून हा काय प्रकार आहे हें त्यानें तेथील एकास विचारल्यावरून तो ह्मणाला, ह्या शहरीं दरवर्षी एक भुजंग मनुष्यरूपानें येत असतो. त्याचे पुढें गावांतील सर्व मुलें उभीं करावीं लागतात. मग त्यांतून तो आपले खुशीस येईल तें मूल घेऊन जातो. त्याचा आजचा येण्याचा दिवस असल्यामुळें हा त्याचे सन्मानार्थ सारें दुःख एकीकडे गुंडाळून समारंभ करीत आहोंत. तें भाषण हातिमाचे हृदयीं खोंचून तो ह्मणाला चिंता नाहीं, मी त्यास आजच ठार करितों. तुह्मी लागेल ती मदत मात्र करा. तें ऐकतांच सर्वांस मोठा हर्ष वाटून त्यानीं राजास हें वर्तमान कळविलें. राजानें हातिमास मोठ्या सन्मानानें आणून ह्मटलें कीं, आपण ह्मटल्याप्रमाणें केल्यास आह्मी तुमचे आभारी होऊं. हातिम ह्मणाला पाहूं काय होईल तें, परंतु ज्या वेळीं तो मुलगा मागेल तेव्हां त्यास सांगा कीं, आमच्या सार्वभौमराजाचा मुलगा आज येथें आला आहे; त्याचे परवानगीवांचून आह्मांस कांहीं करतां येत नाहीं. इतक्यांत भुजंग आल्याची वर्दी आल्यावरून राजा हातिमासह सहपरिवार मंडपांत आला. त्या सर्पाचें शरीर प्रचंड असून रंगही चित्रविचित्र होता. तेव्हां हा कोणी दुष्ट राक्षस सर्परूप घेऊन येथें आला असें हातिमास वाटलें. इतक्यांत सर्पही अंगास पिळे देऊन सुंदर पुरुषाकृति बनला. राजानें तत्काळ त्याला एका चौरंगावर बसविलें, व आपण हात जोडून उभा राहिला. लागलींच पानें मांडून भोजनाची तयारी होऊन सर्पासह सर्वांचीं भोजनें उरकलीं. नंतर पानसुपारी आटोपून भुजंगानें पोरें हजर करण्यास हुकूम केला. पोरें हजर करतांच त्यानें त्या दिवशीं राजपुत्रच पसंत केला. राजा हात जोडून ह्मणाला, सालमजकुरीं ह्या नगरांत आमच्या सार्वभौम राजाचा पुत्र आला आहे. त्याचे आज्ञेवांचून आह्मांस ही असली गोष्ट आज करवणार नाहीं.

भुजंग ह्मणाला असें असेल तर त्यालाच इकडे आणा. राजानें तत्काळ हातिमास पुढें केलें. त्याला पाहून भुजंग ह्मणाला रे इमनच्या राजकुमारा तूं आपल्या ब्रिदासाठीं ह्या लोकांस सहाय्य झालास काय? तुझी माझी पूर्वीची ओळख असून तुझी कीर्ति मी जाणतों सबब एकवार मी तुला सोडून देतों जा. हातिम ह्मणाला महाराज, आपण राजपुत्रास खुशाल न्या मी हरकत करित नाहीं. परंतु पूर्वापर चालीनरूप जें करायचें तें करावें. भुजंग ह्मणाला कोणची चाल? हातिम ह्मणाला आमचे जवळ एक मोतीं आहे तें कांहीं वेळ पाण्यांत टाकून मुलें नेणारास तें प्यावयास द्यावें लागतें. त्यानें कबूल करतांच हातिमानें अक्ष-मोतीं पाण्यांत कांहीं वेळ ठेऊन तें पाणी त्यास दिलें. तें पाणी त्याचे पोटांत जातांच त्याचें सारें सामर्थ्य नष्ट होऊन तो अग-दींच हतवीर्य होऊन गेला. नंतर हातिम ह्मणाला आतां आपण एका पेटींत बसावें. ती पेटी बंद करून आमचा जो कुळधर्म तो आह्मी केल्यावर हाक मारू व आपण पेटींतून बाहेर यावें; नंतर पसंत केलेला मुलगा घेऊन जावा. तेंही त्यानें मान्य केलें. मग हातिमानें राजाकडून एक भक्कम पेटी आणवून ती बंद केली; व लागलाच प्रचंड विस्तव पेटवून त्यांत पेटी टाकून त्याचा निकाल उडविला.' अग्निज्वाळा लागतांच त्या पेटींतून बाहेर येण्याविषयीं त्यानें बहुत प्रयत्न केला. परंतु त्याचें सामर्थ्य नष्ट झाल्यामुळें त्याला अग्निसमाधी घेणें भाग पडलें.

हातिमाचें हें कृत्य पाहतांच सर्वांनीं त्याला यथाशक्ति ज-वाहीर दिलें. हातिमानें लोक ऐकत नाहींत असें पाहून तें द्रव्य घेऊन गोरगरीबांस वाटून टाकलें. नंतर एकदोन दिवसां-नीं तेथून निघाला. मग फकीरानें सांगितलेला तो भयंकर पहाड ओलांडून जेथें दोन रस्ते फुटतात तेथें आला, लांबच्या निर्भय रस्त्यानें जाण्याचा त्याचा विचार होता परंतु भूलचुकीनें

तो भयंकर रस्त्यानेंच चालता झाला. तेथून बराच पुढें गेल्या-वर पाय ठेवण्यास जागा नाहीं असें कांटेऱ्या झाडाचें भयंकर जंगल लागलें. तेव्हां आपण रस्ता चुकलों खास असें वाटून अंगास कांटे बोचून शरीर रक्तबंबाळ होत असतांही परमेश्व-रावर भरवसा ठेऊन तेथून तर पार पडलाच. पुढें पाहतो तों भयंकर क्रूर श्वापदांचे कळपच्या कळप इकडून तिकडे वागडतात असें पाहून तर त्याची पांचावरच धारण बसली. इतक्यांत कांहीं जनावरें ह्याचे अंगावर धांवलीं देखील. तेव्हां संपलें आयुष्य असें जाणून त्यानें शेवटच्यावेळीं ईश्वरास हांक मारली. तोंच पूर्वींचा फकीर तेथें प्रगट होऊन ह्मणाला, पहा दुराग्रहा-नें संकटांत पडलास. असो. फकिरास पाहतांच हात जोडून क्षमा करण्याविषयीं हातिमानें त्याची प्रार्थना केली. तेव्हां फकीर ह्मणाला, ऋक्षकन्येचें मोतीं जमीनीवर ठेव. इतकें बो-लून तो गुप्त झाला. हातिमानें लागलेंच मोतीं जमीनीवर ठेवलें. त्याबरोबर ती सारी जमीन प्रथम पिंवळी, नंतर हिरवी, नंतर लाल होऊन तिचे पासून भयंकर उष्णता उद्भवूं लागली. ती त्या जनावरांस असह्य होऊन ते एकमेकाशीं भांडून उष्णतेचे तापानें तरफडून मेले. तें पाहून ईशस्तुति करून मोतीं उचलून तो चालता झाला. पुढें पूर्वींपेक्षांही कठीण असें कांटेरी रान ला-गलें. तेव्हां प्रारब्धावर भरंवसा ठेऊन तेथून निभावला. तरी कांट्याचे योगानें त्याच्या अंगाच्या चिंधाड्या उडून रक्ताचे योगा-नें त्याचें अंग तांबडे लाल होऊन गेलें होतें. पुढें पुन्हां तो घोर श्वापदसमूहांत आला. तेव्हां मोत्याचे योगानें पूर्ववत सुटून चालता झाला व तो थोड्याच दिवसांनीं एका नगरीं गेला.

तो ज्या रस्त्यानें नगरांत शिरला, तो रस्ता भयंकर असतां निर्भयपणें तो तेथें गेला. तेव्हां तो मार्ग सुधारला अशी क-ल्पना त्याला पाहतांच तेथील लोकांच्या मनांत उद्भवून त्या

लोकांनीं राजास वर्दी दिली कीं, आज भयंकर रस्त्यानें एक मनुष्य नगरांत आला आहे. राजानें तें ऐकतांच हातिमास बोलावून सारी हकीगत विचारली. मग भयंकर तर खराच परंतु एका फकिराची मजवर कृपा झाल्यानें सर्व जनवरांचा नाश करून मी येथें आलों. राजानें तें ऐकून खरें जाणण्यासाठीं कांहीं लोक तिकडे रवाना केले. दोन चार दिवसांत ते लोक परत येऊन ह्मणाले गोष्ट खरी आहे. हिंसक पशूंची जिकडे तिकडे असंख्य प्रेतें पडलीं आहेत. स्वप्नाला देखील तेथें दुष्टप्राणी नाहीं. फक्त कांटेरी जंगल मनस्वी आहे तेव्हढें तोडलें तर हा रस्ता फारच उत्तम होऊन जवळ होईल. व लांबचा फेरा वांचेल.

तें ऐकून राजा हातिमापुढें हात जोडून ह्मणाला, आपले भाषणावर मी भरंवसा ठेवला नाहीं, ह्याबद्दल मला माफी असावी. हातिम ह्मणाला, हें बोलणें नकोच. आपण योग्य तेंच केलें. अपमतलबी लोक स्वार्थासाठीं खूप बाता ठोकतात; परंतु शहाण्यानें खात्री केल्यावांचून त्याचेवर भरंवसा ठेऊं नयेच. इतकें झाल्यावर राजानें हातिमा पुढें जवाहिराचे ढीग ओतून कृतज्ञता दर्शीत केली. हातिम ह्मणाला, मला ह्याचा कांहीं उपयोग नाहीं. शिवाय मी एकाकी प्रवास करतों. तेव्हां हे अगडबंब ओझें मी कसें वागविणार. जर तें माझे ठिकाणापर्यंत पोंचवाल तर मग त्याचा उपयोग होईल. राजा ह्मणाला ठीक आहे. सेवकांकडून पोचतें करवितों. मग हातिम ह्मणाला, तें होईल परंतु मी कांहीं विशेष महत्वाचे कामानिमित्त येथपर्यंत आलों आहे. राजा ह्मणाला तें कोणतें असेल बरें ? हातिम ह्मणाला, मला हमामबादगीर्दची खबर आणणें आहे. तें ऐकतांच राजा ह्मणाला. छी, छी, महाराज ! तिकडे गेले ते आजवर आले नाहींत ह्मणून प्रेमानें सांगतों कीं, आपण हा नाद सोडून मागें फिरा. हातिम ह्मणाला काळत्रयीं ही गोष्ट

होणार नाहीं. तें ऐकून राजा निराश होत्साता ह्मणाला, परमेश्वर आपलें रक्षण करो. मी आतां आपली येथून पुढच्या याकुश शहरापर्यंत रवानगी करतों. तेथून नजीकच तो पर्वत आहे. इतकें बोलून हातिम जायाला निघाल्यावर त्यानें आपले सेवक त्याचे बरोबर दिले.

नंतर याकुश शहरच्या नजीक जातांच हातिम सेवकांस मागें परतवून एका धर्मशाळेंत उतरला. नंतर नजराण्याला फक्त कांहीं जवाहीर घेऊन एके दिवशीं तो राजाचे भेटीस गेला. नजराणा पाहतांच राजाला परम संतोष होऊन येथपर्यंत येण्याचें कारण विचारलें. हातिम ह्मणाला दुसरें कांहीं नाहीं. केवळ आपली कीर्ति ऐकून येथें आलों. मग राजानें कांहीं दिवस नित्य भेटीचा लाभ होण्याची विनंती करून त्याची रवानगी केली. नंतर हातिमानें नित्य एकवेळ राजदर्शनास जाऊन त्याचें मन पूर्ण मोहून घेतलें व पुन्हां एकवेळ नजराणा दिला. राजा त्यावेळीं आनंदित होऊन ह्मणाला महाराज ! ह्या नजराण्यानुरूप उलट आपली संभावना करण्यास माझें सगळें राज्यही पुरणार नाहीं. हातिम ह्मणाला मोबदला केलाच पाहिजे असें माझ्या मनांत देखील नाहीं. आतां जर आपली इच्छाच असेल तर माझी एक विनंती मान्य करावी. राजा ह्मणाला ठीक आहे. होईल तेवढा प्रयत्न करून आपला हेतु पूर्ण करीन.

मग राजास वचनांत गुंतवून हातीमानें आपला हेतू स्पष्टपणें त्याला कळविला. तें ऐकतांच तो अत्यंत निराश होऊन ह्मणाला फारच कठीण गोष्ट. कांकीं, तें स्थान फारच भयंकर, जे तेथें गेले त्यांतून कोणीच माघारा येत नाहीं. असें जाणून तिकडे कोणास जाऊं द्यावयाचें नाहीं अशी मी निखालस शपथ घेऊन तेथें पाहरेकरी ठेऊन अगदीं बंदोबस्त करून टाकला आहे. हातिम ह्मणाला, आपण बेफिकीर असा. आजवर लो-

लोकांनीं राजास वर्दी दिली कीं, आज भयंकर रस्त्यानें एक मनुष्य नगरांत आला आहे. राजानें तें ऐकतांच हातिमास बोलावून सारी हकीगत विचारली. मग भयंकर तर खराच परंतु एका फकिराची मजवर कृपा झाल्यानें सर्व जनवरांचा नाश करून मी येथें आलों. राजानें तें ऐकून खरें जाणण्यासाठीं कांहीं लोक तिकडे रवाना केले. दोन चार दिवसांत तें लोक परत येऊन ह्मणाले गोष्ट खरी आहे. हिंसक पशूंची जिकडे तिकडे असंख्य प्रेतें पडलीं आहेत. स्वप्नाला देखील तेथें दुष्टप्राणी नाहीं. फक्त कांटेरी जंगल मनस्वी आहे तेव्हडें तोडलें तर हा रस्ता फारच उत्तम होऊन जवळ होईल. व लांबचा फेरा वांचेल.

तें ऐकून राजा हातिमापुढें हात जोडून ह्मणाला, आपले भाषणावर मी भरंवसा ठेवला नाहीं, ह्याबद्दल मला माफी असावी. हातिम ह्मणाला, हें बोलणें नकोच. आपण योग्य तेंच केलें. अपमतलबी लोक स्वार्थासाठीं खूप बाता ठोकतात; परंतु शहाण्यानें खात्री केल्यावांचून त्यांचेवर भरंवसा ठेऊं नयेच. इतकें झाल्यावर राजानें हातिमा पुढें जवाहिराचे ढीग ओतून कृतज्ञता दर्शित केली, हातिम ह्मणाला, मला ह्याचा कांहीं उपयोग नाहीं, शिवाय मी एकाकी प्रवास करतों. तेव्हां हे अगडबंब ओझें मी कसें वागविणार. जर तें माझे ठिकाणापर्यंत पोंचवाल तर मग त्याचा उपयोग होईल. राजा ह्मणाला ठीक आहे. सेवकांकडून पोचतें करवितों. मग हातिम ह्मणाला, तें होईल परंतु मी कांहीं विशेष महत्वाचे कामानिमित्त येथपर्यंत आलों आहे. राजा ह्मणाला तें कोणतें असेल बरें ? हातिम ह्मणाला, मला हमामबादगीर्दची खबर आणणें आहे. तें ऐकतांच राजा ह्मणाला. छी, छी, महाराज ! तिकडे गेले ते आजवर आले नाहींत ह्मणून प्रेमानें सांगतों कीं, आपण हा नाद सोडून मागें फिरा. हातिम ह्मणाला कालत्रयीं ही गोष्ट

होणार नाहीं. तें ऐकून राजा निराश होत्साता ह्मणाला, परमेश्वर आपलें रक्षण करो. मी आतां आपली येथून पुढच्या याकुश शहरापर्यंत रवानगी करतों. तेथून नजीकच तो पर्वत आहे. इतकें बोलून हातिम जायाला निघाल्यावर त्यानें आपले सेवक त्याचे बरोबर दिले.

नंतर याकुश शहरच्या नजीक जातांच हातिम सेवकांस मागें परतवून एका धर्मशाळेंत उतरला. नंतर नजराण्याला फक्त कांहीं जवाहीर घेऊन एके दिवशीं तो राजाचे भेटीस गेला. नजराण्या पाहतांच राजाला परम संतोष होऊन येथपर्यंत येण्याचें कारण विचारलें. हातिम ह्मणाला दुसरें कांहीं नाहीं. केवळ आपली कीर्ति ऐकून येथें आलों. मग राजानें कांहीं दिवस नित्य भेटीचा लाभ होण्याची विनंती करून त्याची रवानगी केली. नंतर हातिमानें नित्य एकवेळ राजदर्शनास जाऊन त्याचें मन पूर्ण मोहून घेतलें व पुन्हां एकवेळ नजराणा दिला. राजा त्यावेळीं आनंदित होऊन ह्मणाला महाराज ! ह्या नजराण्यानुरूप उलट आपली संभावना करण्यास माझें सगळें राज्यही पुरणार नाहीं. हातिम ह्मणाला मोबदला केलेंच पाहिजे असें माझ्या मनांत देखील नाहीं. आतां जर आपली इच्छाच असेल तर माझी एक विनंती मान्य करावी. राजा ह्मणाला ठीक आहे. होईल तेवढा प्रयत्न करून आपला हेतु पूर्ण करीन.

मग राजास वचनांत गुंतवून हातीमानें आपला हेतू स्पष्टपणें त्याला कळविला. तें ऐकतांच तो अत्यंत निराश होऊन ह्मणाला फारच कठीण गोष्ट. कांकीं, तें स्थान फारच भयंकर, जे तेथें गेले त्यांतून कोणीच माघारा येत नाहीं. असें जाणून तिकडे कोणास जाऊं द्यावयाचें नाहीं अशी मी निखालस शपथ घेऊन तेथें पाहरेकरी ठेऊन अगदीं बंदोबस्त करून टाकला आहे. हातिम ह्मणाला, आपण बेफिकीर असा. आजवर को-

ंडाच्या पुतळयासही असह्य असे क्लेश मी भोगिले आहेत. असें बोलून त्यानें बानूसंबंधीं आजवर घडलेली कच्ची हकी-कत तेथें वर्णन केली. तेव्हां केवळ परोपकारार्थ जर हातिम येव्हढे श्रम घेत आहे तर परमेश्वर त्याचेवर कधीं संकट येऊं देणार नाहीं असा विचार करून परवानगी देतों म्हणून राजानें हातिमास सांगितलें. नंतर तेथील रखवालदारांच्या नांवानें एक पत्र तयार करून सेवकांबरोबर हातिमाची रवानगी केली. सेव-कानें एक दोन दिवस प्रवास करून चौकीपर्यंत पोंचवून तेथील जमादाराचे स्वाधीन राजाचें पत्र केलें. त्यांत मजकूर इतकाच होता कीं, 'सदर्हू मनुष्यास हमामबादगीर्द पाहण्याची परवानगी दिली आहे. परंतु तो स्वखुषीनें तेथील भयंकर स्थळीं न जा-ईल अशी तजवीज कराल तर आपणांस मोठें इनाम मिळेल' असें पत्र पाहून त्यानें सेवकास माघारीं लावून हातिमास आ-पले घरीं नेलें. नंतर एक अर्धा दिवस पाहुणचार झाल्यावर रखवालदारानें पर्वतांतील भयप्रद स्थानाचें वर्णन करून हाति-मास जाण्याविषयीं बहुत प्रकारें निषेधिलें. परंतु तो आपला हेका सोडिना तेव्हां निरुपाय होऊन त्यानें त्यास पर्वतांतील हमामखान्याच्या दरवाज्यापर्यंत पोंचतें केलें.

तो दरवाजा दोन माड उंच दिसत होता. शिवाय तेथेंच एका भिंतीवर 'ह्या पर्वतामधील हमामखान्यांत जहांगीरराजानें इंद्रजाल केलें आहे. तें बहुतकाळ पावेतों टिकेल. तेथें जो मनुष्य जाईल तो कधींच परत येणार नाहीं. मात्र क्षुधातृ-षेची पीडा होणार नाहीं' असा मजकूर लिहिला होता. येवढा मजकूर वाचून 'मिळाली येव्हढी माहिती बस आहे' असें हातिमास प्रथम वाटलें व आतां मागें फिरणार तोंच त्याचे म-नांत 'चक्षुर्वैसत्यं' झालेंच पाहिजे असें येऊन तो रखवाल-दारांस सलाम करून दरवाज्याचे आंत गेला. नंतर मागें उ-

पहातो तों तो दरवाजा अथवा रखवालदार ह्यांपैकीं कांहींच दिसेना. तेव्हां त्याचे मनांत अनेक तरंग उद्भवूं लागले. नंतर थोडावेळ गेला नाहीं तोंच कोणी मनुष्य आपलेकडे येत आहे असें पाहून त्याचे जिवास अंमळ धीर आला. जवळ येतांच हातिमानें त्यास सलाम केला. त्यानें चटकन हातिमास एक तसबीर दिली. त्यांत हातिम पाहतो तों हमामखान्याची आकृति त्याला दिसली. तेव्हां तो त्या मनुष्यास ह्मणाला, तूं ह्या हमामखान्यावरील नोकर आहेस काय? तो ह्मणाला होय. कोणी मनुष्यें हा हमामखाना पाहण्यास आल्यास त्याची योग्य बंदोबस्ती ठेवण्याचे कामी पुष्कळ चाकर येथें आहेत. आजची पाळी माझी आहे. या माझे मागें. हातिम ह्मणाला जर तूं उत्तम बरदास्त ठेवशील तर मी तुला बक्षीस देईन. तो ह्मणाला ठीक आहे या असे. इतकें बोलत ते हमामखान्यापर्यंत गेले. ती इमारत फारच नामी असून तिला एक शिखर होतें. चाकर आंत गेल्यावर त्यानें खूणकरून हातिमास आंत बोलाविलें. हातिम आंत जाऊन पाहतो तों एक सुंदर दगडांनीं बांधलेली टांकी त्याला दिसली. चाकर ह्मणाला ह्या टाकींत स्नान करण्याची इच्छा असल्यास आपण आंत उतरावें. ह्मणजे मी अंगावर पाणी घालतों. हातिम तत्काळ पांघुरणें एकीकडे ठेऊन आंत उतरला. चाकरानें त्याचे अंगावर तीन तांबे पुरते घातले नसतील तोंच मोठा गडगडाट होऊन जिकडे तिकडे अंधार माजला. कांहीं वेळानें गडगडाट बंद होऊन प्रकाश पडला. तेव्हां हातिम पाहतो तों हमामखान्याचें शिखर उंचउंच वाढत आहे व टाकींतील पाणीही चढत आहे असें त्यास दिसलें. शेवटीं त्याचे तोंडापर्यंत पाणी चढून थोड्याच वेळानें जिकडे तिकडे पाणीच पाणी होऊन गेलें. हातिमास तेथून बाहेर निघतां येईना. तेव्हां

आपण कोणाचेंच ऐकलें नाहीं ह्याबद्दल त्याला फारच वाईट वाटूं लागलें. तरी विधि लेख चुकत नाहीं असें जाणून तो तेथें तरंगूं लागला. पाणी शेवटीं शिखरापर्यंत वाढलें. त्यावेळीं हातिमानें पटकून शिखरास धरलें. तोंच भयंकर गडगडाट होऊन 'एका मैदानांत उभे आहोंत' असें हातिमास दिसलें. तेथून चालला असतां एक सुंदर महाल त्याचे दृष्टी पडला. दरवाजा उघडा असल्यामुळें तो महालांत गेला. इतक्यांत बाहेर रहावें हेंच बरें असें वाटून तो मागें फिरला. तों तो दरवाजा त्याला मुळीच सांपडेना तेव्हां हेंही इंद्रजालच आहे असें त्यास वाटून तो महालांत हिंडूं लागला. तेथें त्याला खाण्याचे नामी नामी पुष्कळ पदार्थ दिसले व त्यानें ते मनसोक्त खाल्ले. परंतु खाल्यासारखें कांहींच वाटेना म्हणून त्याला भारी आश्चर्य वाटलें. पुढें तो मुख्य दिवाणखान्यांत गेला. तेथें संगमरवरी दगडांचे मनस्वी पुतळे खालच्या फरसबंदींत अर्धे पुरलेले त्याला दिसले. त्यांकडे पाहून अनेक कल्पना एका मागून एक त्याचे पोटांत उसळूं लागल्या. इतक्यांत ' हे मनुष्या, ह्या ऐंद्रजालांत पडून आपल्या अमोल अशा प्राणास व्यर्थ धोक्यांत घातलेंस. असे शब्द झाले. ते ऐकून तो चकित होऊन चोहींकडे वेड्यासारखा पाहूं लागला. हे शब्द एका पोपटानें उच्चारले असल्यामुळें त्याला मनुष्य तेथें कोणीच दिसेना. पुढें पाहतो तों एका सुंदरशा संगमरवरी शिळेवर एक स्पष्ट लेख कोरला होता. तो पाहून हातिम मोठ्या आतुरतेनें वाचूं लागला. त्यांतील मजकूर असा कीं–'हे मानवा येथपर्यंत तूं आलास, तर आतां येथून तुझी सुटका होणार नाहीं. येथें जहांगीर राजानें सारें इंद्रजाल पसरलें आहे. ह्याचे कारण इतकेंच कीं, तो ह्याप्रदेशीं सहल करीत असतां त्याला येथें एक अमोल हिरा सांपडला. तसाच दुसरा पैदा करण्याविषयीं त्यानें पराकाष्ठेचा प्रयत्न केला.

परंतु तो व्यर्थ गेल्यावरून हें अमोल रत्न कोणाच्या हातीं लागूं नये ह्मणून त्यानें अनेक जादूगारांच्या मदतीनें येथें इंद्रजाल केलें आहे. नंतर हा महाल बांधून तो हिरा एका ऐंद्रजालिक पटाचे पोटांत घालून ठेवला आहे. तो पोपट या महालां-तच आहे. व तेथें जवळच एका सुवर्ण चौरंगावर एक धनुष्य व बाण ठेवले आहेत. ज्यास येथून आपली सुटका करून घेणें आहे त्यानें त्या पोपटास तीन बाण मारून ठार करावें, तो हिरा घ्यावा. पण तीन बाणांत कार्यसिद्धी झाली ना-तर त्यास संगमरवरी दगडाचा पुतळा होऊन रहावें लागेल. तो लेख वाचतांच हे पुतळे आपल्याप्रमाणेंच येथें आलेल्या मनुष्यांचे बनले असें हातिमाच्या लक्षांत आलें. मग आपली ही हीच गति होणार. कदाचित आजवर हरएक कामांत ईश्वरानें जसें यश दिलें तसें ह्याही वेळीं देणार नाहीं कशावरून? असा विचार करून तो तें धनुष्य घेऊन पोपटाच्या पिंजऱ्या समोर उभा राहिला व लागलेंच संधान धरून त्यानें पोपटा वर बाण सोडला. परंतु पोपट त्वरा करून पिंजऱ्यावर चढून बसला त्यामुळें एक बाण फुकट जाऊन गुडघ्यापर्यंत हातिमाचें अंग दगडाचें बनलें. इतक्यांत पोपट ह्मणाला रे मनुष्या, आ-जून तरी हात आटोप नाहीं तर जास्त दुःखांत पडशील. तें ऐकून हातीमाचे डोळयांतून आंसवें गळूं लागलीं. परंतु हातीं धरलेलें काम अर्धवट टाकावयाचें नाहीं असें वृद्धाचें वाक्य त्याचें लक्षांत येऊन त्यानें नशीबाची परीक्षा पाहण्यासाठीं पु-न्हा एक बाण मारिला तोही व्यर्थ जाऊन त्याचें अर्धें अंग दगडी झालें. मग यावत् प्राण तावत् प्रयत्न केला पाहिजे असा विचार करून परमेश्वराची प्रार्थना केली आणि मग नीट संधान राखून त्यानें तिसरा बाण मारला; तोंच पोपट मृत हो-ऊन खालीं पडला. लागलीच ब्रह्मांडकल्लोळ असा गडगडाट

ध्वनी होऊन अंधकारानें तो प्रदेश भरून गेला; तेणें करून हातिमास फारच भीति वाटली.

नंतर थोडावेळ झाला नाहीं तोंच ते सर्व अरिष्ट शांत होऊन महाल वगैरे सर्व नष्ट झालें. फक्त पोपट पडला होता तेथें तो अमोलहिरा मात्र पडला होता. तो हातिमानें हातीं घेतांच सर्व पुतळे मनुष्यरूपी बनून हातिमाचे पायांवर लोळूं लागले. नंतर ह्या इंद्रजालांतून आपण आमची कशी सुटका केली हें विचारल्यावरून हातिमानें त्यांस कच्ची हकीगत सांगितली; तें ऐकून त्यांनीं हातिमाचे मनस्वी आभार मानिले. नंतर हातीम त्यांसह परत येत असतां पुष्कळ रखवालदारांची त्याची गांठ पडून त्यानें सर्वांप्रत ती गोष्ट पुन्हां पुन्हां सांगितली. तेणें करून सर्वांस मोठा आनंद होऊन ते सर्व लोक याकुत्स मधील राजाकडे मोठ्याच उत्कंठेनें गेले. राजाची हातिमाची गांठ होतांच हातिमानें वजळणी करून ह्मटलें कीं, आपण मला पुष्कळ सहाय केलें. त्याबद्दल हा हिरा मी आपणास देणार आहें; परंतु शहाबादेस गेल्यावर तो मी पाठवून देइन. आतां मी इतकीच विनंती करतों कीं, हे जे लोक माझे बरोबर आहेत ते निराश्रित आहेत त्यांचें आपण रक्षण करावें. तें राजानें मान्य करून एकदोन दिवसांनी बरोबर सेवक देऊन हातिमाची रवानगी केली.

शहाबादेस येऊन हातिमानें मुनिरशहाची गांठ घेतली. आपलेसाठीं ह्यानें फार कष्ट भोगले ह्मणून मुनिरशहास फार खेद वाटला. नंतर ते दोघे हसनूबानूकडे गेले. हातिम यशस्वी होऊन आला हें ऐकून तिला परम आनंद झाला. नंतर क्षेम कुशल आटोपून हातिमानें पुराव्यासाठीं हिरा दाखवून कर्षे वर्तमान निवेदन केलें. ह्याप्रमाणें आपल्या सातही प्रश्नांचा उलगडा झाल्यामुळें बानूनें आपले दाईचे अनुमतें मोठ्या समा-

रमानें मुनीरशहाशीं लग्न लावून घेतलें. नंतर हातिमानें तो हिरा याकुत्सराजाकडे सेवका बरोबर रवाना केला. ह्या वेळीं मुनीरशहा हातिमाचे पायांवर लोळून ह्मणाला, आपले उपकार या जन्मीं फिटणार नाहींत. हातिम ह्मणाला तुह्मी उभयतां आमरण प्रेमानें वागलां ह्मणजे माझे उपकार फिटलें असें मी मानतों. इतकें झाल्यावर त्यांची रजा घेऊन तो इमनशहरीं जाण्यास निघाला.

नंतर इमन शहरीं पोंचल्यावर लोकांनीं त्यावर पुष्पवृष्टी करून घरोघर उत्छाह चालू केले. नंतर मातापित्यास भेटून त्यानें गोरगरीबास बहुत दानधर्म केला. पुढें ताई राजानें ह्मणजे हातीमाच्या पित्यानें सुमुहुर्तीं त्यास राज्याभिषेक केला. हातिमानें पुष्कळ वर्षें प्रजेचें पुत्रवत पालन केलें. तेणेंकरून त्याची चोहोंमुलकीं त्याची कीर्ति पसरून औदार्याचे योगानें तो उत्तम लोकांत जाता झाला.





| | | | |
|---|---|---|---|
| रामविजय | १ | ४ | ० |
| श्रीकृष्णबोध | ० | ६ | ० |
| भक्तिरसामृत | ० | ६ | ० |
| संसारचोपडी ( छापत आहे ) | ० | ६ | ० |
| इंद्रजाल भाग २ रा | ० | ६ | ० |
| शृंगारसागर दहा ( दरवेशाच्या गोष्टी ) | १ | ४ | ० |
| शृंगारसुंदर भाग १ ला | २ | ४ | ० |
| ,, भाग २ रा | २ | ८ | ० |

यांशिवाय निर्णयसागर, गणपत कृष्णाजी वगैरे छाप-खान्यांतील व पोतदार, गोपाळ नारायण कंपनी इत्यादि सर्व बुकसेलरांकडील आणि इतर सर्व जातीचीं पुस्तकें खालीं सही करणार याजकडेस विकत मिळतील.

तसेंच हें हातीमताई चरित्र खालीं सही करणाराकडे, विठ्ठलवाडीचे नाक्यावर बाळकृष्ण लक्ष्मण पाठक याज-कडे; कांदेवाडींत वासुदेव मोरेश्वर पोतदार यांजकडेस, लक्ष्मण भगोबा पोंवार पुणे पेठ बुधवार यांजकडेस, आणि सातारा येथें ग्यानू रावजी पाष्टे बुकसेलर याज-कडेस विकत मिळतील.

व्यंकटेश विठ्ठल पै.

बुकसेलर–माधवबाग–मुंबई